


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत मराठी अभ्यास परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या भाषा आणि जीवन ह्या नियतकालिकाच्या (त्रैमासिक) अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून मराठी अभ्यास परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका

उनाड वणवण दिवस संपला.
गोठवणारी रात्र बोचरी.
पाचोळ्याची फरफर पाहत.
श्वानही निजला कुशीत सावध.



# मराठी अभ्यास परिषद पत्रिका

## भाषा आणि जीवन

वर्ष ११ : अंक १-२ : हिवाळा - उन्हाळा १९९३

अनुवाद विशेषांक - उत्तरार्ध

## अनुक्रम



---

**प्रकाशन :** त्रैमासिक (जानेवारी, एप्रिल, जुलै, ऑक्टोबर)
**संपादन समिती :** कल्याण काळे (प्रमुख), अशोक रा. केळकर, अंजली सोमण, द. दि. पुंडे, प्र. ना. परांजपे, मॅक्सीन बर्न्सन, विजया देव, आशा मुंडले, मृणालिनी शहा.
**संपादकीय संपर्क व परीक्षणार्थ पुस्तके :** कल्याण काळे, मराठी विभाग, पुणे विद्यापीठ, पुणे ४११ ००७ (दूरध्वनी : ३३६०६१/२४)
**व्यवस्थापकीय संपर्क व पैशाचा भरणा :** मृणालिनी शहा, १ शीतल अपार्टमेंट्स्, ४६/४ एरंडवणे, पुणे ४११ ००४ (दूरध्वनी ३३३८६९)
**पत्रिकेची वर्गणी, परिषदेची वर्गणी, जाहिरातीचे दर :** आवरणपृष्ठ तीन पाहा.
**सूचना :** पत्रिकेत प्रसिद्ध होणाऱ्या लेखांच्या लेखकांच्या मतांशी संपादक किंवा परिषद सहमत असतीलच, असे नाही.
या अंकाच्या मुद्रणासाठी महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाचे अंशतः अनुदान मिळालेले आहे.

---

संपादक : कल्याण काळे / प्रकाशक व मुद्रक : मराठी अभ्यास परिषदेसाठी मृणालिनी शहा
भाषांतर अंकाचे संपादन-संयोजन-डॉ. अंजली सोमण
मुखपृष्ठ / बालम केतकर, सुलेखन / शाम देशपांडे
मुद्रणस्थळ : संजीव मुद्रणालय, ४६९ सदाशिव पेठ, पुणे ४११ ०३०.

# अनुवाद आणि भाषेचे पोषण

'भाषा आणि जीवन' च्या या पूर्वीच्या 'अनुवाद विशेषांका'ला वाचक आणि लेखक यांच्याकडून चांगला प्रतिसाद मिळाल्यामुळे हा अंकही आम्ही 'अनुवाद विशेषांक' म्हणून काढत आहोत. या अंकात मुख्यत्वे अनुवादाच्या उपयोजित अंगांची चर्चा करणारे लेख आहेत.

परभाषांतील श्रेष्ठ साहित्य आपल्या भाषेत अनुवादित करण्याचे महत्त्व विसाव्या शतकाच्या शेवटच्या दशकात आता मुद्दाम सांगण्याची गरज राहिली नाही. परभाषासंपर्काची अनुवाद ही एक प्रक्रिया आहे. पण यापेक्षा वेगळ्या मार्गांनीही आपला परभाषांशी संपर्क येत असतो. परभाषासंपर्क कधी आपल्या भाषेचे पोषण करतो, तर कधी तिच्या स्वतंत्र विकासाच्या शक्यता खुंटवून टाकतो. मराठी भाषेच्या इतिहासात 'परभाषा–पुष्टतेच्या' आणि 'परभाषा–ग्रस्ततेच्या' लाटा क्रमाक्रमाने येऊन गेलेल्या दिसतात.

'अनुवाद' आणि 'रूपान्तर' या दोन्ही प्रक्रिया आता आपल्याकडे चांगल्याच रुळल्या आहेत. काही प्रतिभावंत लेखक याच्या पलीकडे जातात. परभाषांतील श्रेष्ठ साहित्यकृतींची बीजे आपल्या अनुभवविश्वात सामावून घेऊन आपल्या संस्कृतीच्या परिवेशात ते कलाकृतींचे नव-सर्जन करतात. या प्रक्रियेला आता 'अनुभवान्तर' हे नाव रूढ झाले आहे. भाषेचे पोषण करण्याचाच हा एक मार्ग आहे. वि.वा. शिरवाडकरांच्या काही नाटकांना अनुभवान्तरित नाटके म्हणता येईल.

वरील तीन प्रक्रियांचा पदर धरून काही भुरटे प्रकारही साहित्यक्षेत्रात आलेले दिसतात. त्यांतील पहिला प्रकार म्हणजे रूपांतर करायचे, पण मूळ कृतीचा उल्लेख करायचा नाही. केवळ 'कल्पना परकीय' असा मोघम उल्लेख करून वेळ मारून न्यायची. दुसरा प्रकार, म्हणजे मूळ साहित्यकृतीचा उल्लेख न करता उघड-उघड वाङ्मयचौर्य करायचे. व्यंकटेश माडगूळकरांच्या 'सत्तांतर'च्या निमित्ताने वाङ्मयचौर्याचा वाद गाजला. विजय तेंडुलकर आणि रत्नाकर-मतकरी यांच्या काही नाटकांवर वाङ्मयचौर्याचे आरोप केले गेले. वाङ्मयचौर्यामुळे स्वभाषा-पोषण किती होते, हा मतभेदाचा मुद्दा असला, तरी वाङ्मयचौर्याच्या आरोपामुळे साहित्य-समीक्षेच्या क्षेत्रात वादविवादांच्या भरपूर धुराळा उडतो, हे मात्र निश्चित. प्रभाव आणि वाङ्मयचौर्य यांच्यांतील सीमारेषा पुसट असल्यामुळे हे वाद नेहमीच निसरडे असतात. शिवाय 'Great minds think alike' या उक्तीचा आधार घेऊन वाङ्मयचौर्याच्या आरोपातून हात झटकून मोकळे होता येते.



अनुक्रमणिका

इंग्रजी अमलाच्या सुरुवातीचा काळ मराठी वाङ्मयाच्या इतिहासात 'भाषान्तर युग' म्हणून ओळखला जातो. या काळात संस्कृत, अरबी-फार्सी आणि इंग्रजी साहित्यातील कथात्म गद्य-वाङ्मयाची मराठीत भाषान्तरे झाली. त्यांतून मराठीत आधुनिक पद्धतीच्या गद्य-वाङ्मयाची जडणघडण झाली. त्यापूर्वी महानुभाव गद्य आणि बखरी सोडल्या, तर प्राचीन मराठी वाङ्मय पद्यबद्ध होते.

'भाषान्तर-युगात' भाषान्तरे झाली, ती मुख्यत्वे अद्भुतरम्य कथा-कादंबऱ्यांची आणि रेनॉल्डस्च्या सुमार दर्जाच्या इंग्रजी कादंबऱ्यांची. ही उणीव १८८० नंतर हरी नारायण आपटे यांच्या वास्तववादी कथा-कादंबऱ्यांनी भरून काढली. हरीभाऊंच्या डोळ्यांसमोर इंग्रजीतील वास्तववादी कादंबऱ्यांचा आदर्श होता. याच काळात केशवसुत इंग्रजीतील रोमँटिक काव्य-परंपरेशी नाते सांगणारी आधुनिक मराठी कविता घडवत होते आणि कवितेच्या समृद्धीच्या शक्यता दाखवत होते. स्वतंत्र निर्मिती करत असतानाच केशवसुतांनी काही चांगल्या इंग्रजी कवितांची मराठी भाषान्तरेही केलेली आहेत.

१९२० ते ४५ हा कालखंड मराठी साहित्याच्या दृष्टीने परभाषा-ग्रस्ततेचा ठरला. या काळातील कवितेवर रविकिरण मंडळाचा प्रभाव होता, तर कथा-कादंबरीवर ना.सी. फडके यांचा. रविकिरण मंडळाने इंग्रजी वाङ्मयाबरोबर अरबी-फार्सी भाषांतूनही रचनाबंध मराठीत आणले. पण वाङ्मयाची परंपरा पुढे नेण्यासाठी आणि सकस साहित्यनिर्मिती करण्यासाठी जी जाज्वल्य मनोवृत्ती लागते, ती या काळात पर-भाषेच्या प्रभावाखाली असलेल्या कोणत्याच साहित्यकारापाशी नव्हती. त्यामुळे परभाषा-संपर्क फलदायी ठरला नाही.

याच काळात ना.सी. फडक्यांचे 'प्रतिभा-साधन' प्रसिद्ध झाले. 'प्रतिभा-साधन' मधील साहित्य-विचार फडक्यांनी क्लेटन हॅमिल्टनच्या पुस्तकातून चोरला आहे, असा त्यांच्यावर उघड आरोप झाला. वातावरण तापले. हे लेखन स्वतंत्र आहे, की वाङ्मयचौर्य, याची चौकशी करण्यासाठी समिती नेमली गेली. हे वाङ्मय-चौर्य मात्र मराठीचे पोषण करणारे निश्चितच नव्हते. कारण मुळात हॅमिल्टनने मांडलेला साहित्यविचार कारागिरीप्रधान आणि तत्कालीन विद्वानांची मान्यता नसलेलाच होता. फडक्यांनी 'प्रतिभा-साधन' मधून मांडलेला तथाकथित 'कलावाद' पुढे मराठी साहित्याला, विशेषतः कादंबरीला, अनेक वर्षे भोवला. या काळात केवळ मराठीच्या प्राध्यापकांनाच नाही, तर इंग्रजीच्या प्राध्यापकांनाही टी.एस्. एलिएटचे काव्य आणि कर्तृत्व माहीत नव्हते, असे जाणकार सांगतात. खरे तर, हा एलिएटच्या बहराचा काळ होता. या काळात शिकल्या व शिकवल्या जाणाऱ्या वाङ्मयाच्या अभ्यासक्रमाची दारुण अवस्था प्रा.रा.भा. पाटणकरांनी 'प्रतिष्ठान'-ऑक्टोबर ९२ मधील एका लेखातून स्पष्ट केलेलीच आहे.

दुसऱ्या महायुद्धानंतर हे चित्र बदलले. मर्ढेकरांवर एलिएट आणि येट्स् यांच्या कवितांचा

प्रभाव होता. त्यांनी व गंगाधर गाडगीळांनी समकालीन वास्तवाला भिडणाऱ्या समर्थ नवकवितेची आणि नवकथेची जडणघडण केली. १९६० नंतर विद्रोही लेखकांची नवी पिढी पुढे आली. हे साहित्यिक जीवनाच्या भट्टीतून तावून-सुलाखून निघालेले होते. त्यांतल्या भालचंद्र नेमाड्यांसारख्या काहींना जागतिक वाङ्मयाचे आणि साहित्य-विचाराचे चांगले आकलन होते. त्यांनी कादंबरीच्या क्षेत्रात क्रांती केली आणि एकूणच साहित्याकडे बघण्याच्या दृष्टिकोनात बदल घडवून आणला.

१९८० ते ९० या दशकात फारसे नवे आणि महत्त्वाचे असे मराठी साहित्याच्या क्षेत्रात घडले नाही. मात्र याच काळात आदिबंधात्मक समीक्षा, घटितार्थ शास्त्र, संरचनावादी समीक्षा, शैलीवैज्ञानिक समीक्षा, विरचना...इत्यादी, इत्यादी अनेक समीक्षापद्धती पाश्चात्त्य साहित्यविचारातून आपल्याकडे आयात केल्या गेल्या. त्याही न समजणाऱ्या इंग्रजी वळणाच्या मराठी भाषेतून. डिसेंबर, १९९२ मधे झालेल्या पहिल्या कोकण साहित्य संमेलनाच्या अध्यक्षपदावरून कविवर्य मंगेश पाडगावकर यांनी मराठीतील दुर्बोध नवसमीक्षेचे विडंबन केले. त्यावर वृत्तपत्रांतून किरकोळ चर्चा-प्रतिचर्चाही झाली. (आपल्या समाजातील बुद्धिमत्तेला हल्ली शेअर बाजारातील उलाढाली; तंत्रज्ञान, संगणक, इत्यादींमध्ये अधिक रस असल्यामुळे साहित्यविषयक वाद अकटोविकटीला जात नाहीत. शिवाय पेपरवाल्यांनाही अशा गोष्टींसाठी द्यायला जागा नसते.)

समीक्षाव्यूह मिग विमानांसारखे किंवा बोफोर्स तोफांसारखे आयात करता येत नाहीत. (वर उल्लेखिलेले नवसमीक्षेचे विडंबन म्हणजे मराठी समीक्षेतील 'बोफोर्स' विरोधीची आघाडी नाही ना!) देशाची भौतिक व सामाजिक परिस्थिती → त्यातून निर्माण होणारे साहित्य → साहित्याच्या निर्मितिकालात समांतरपणे वाहणारी व विकसित होत जाणारी सामाजिक शास्त्रे → या सर्वांच्या अनुबंधातून निर्माण होणारे नवे समीक्षाव्यूह-असा समीक्षाव्यूहांचा विकासक्रम असतो. अशा परिस्थितीत समीक्षाव्यूह सुटेपणाने आयात करून कसे चालेल? हे 'जंगम' आणायचेच असेल, तर आपली 'देशकालपरिस्थिती' या 'स्थावरा'चा विचार करून ते पचवून आणायला हवे, रुजवायला हवे. फक्त आयात करून किंवा परभाषेतून अनुवादित करून चालणार नाही. नुसता देरिदा किंवा त्याचा 'विरचनावाद' मराठीत आणून चालत नाही. कारण देरिदाची मुळे नित्शेमधे असतात आणि नित्शेची त्या विशिष्ट काळातील वैचारिक वातावरणात. शिवाय विरचना किंवा शैलीविज्ञान या पद्धती वापरण्यासाठी भाषाविज्ञानाचे उत्तम ज्ञान हवे. आपल्याकडे मात्र शैलीवैज्ञानिक समीक्षेची 'वॉशिंग्टनी' कुऱ्हाड नव्याने आयात केल्यानंतर अनेक हौशा-गवशांनी ती कवितेच्या झाडावर चालवून घेतली आणि कवितेचा आस्वाद यांत्रिक करून टाकला. शैलीविज्ञानातील मूलतत्त्वे वापरून कवितेचे किती सुंदर, सुबोध आणि मर्मग्राही विवेचन करता येते, हे गो.वि.

करंदीकरांनी त्यांच्या 'नवता आणि परंपरा' मधील मर्ढेकरांच्या लेखात दाखवून दिले आहे. त्याची आठवण इथे आल्याशिवाय राहत नाही.

समीक्षा हा महत्त्वाचा व्यवहार असूनही अलीकडे तो उपेक्षित झाला आहे. पण ज्या होतकरूंना या क्षेत्रात यावे असे वाटत असेल आणि स्वतंत्र विचाराचे काही कोंभ त्यांच्या प्रज्ञेला फुटत असतील, त्यांना आयात समीक्षा-पद्धतींचा सध्या माजवलेला दुर्बोध बडिवार बघून आपल्याला 'यातले' आणि 'असले' अवघड काही लिहिता येत नाही, तेव्हा न लिहिलेलेच बरे, असे वाटण्याचा धोका आहे.

जी गोष्ट साहित्यव्यवहारात, तीच वैचारिक क्षेत्रातही दिसते. लोकमान्य टिळक, वि.का. राजवाडे, इत्यादी मान्यवरांचा तत्कालीन पाश्चात्त्य विचारव्यूहांचा चांगला अभ्यास होता. त्यांनी ते पचवून स्वदेशकालपरिस्थितीबद्दलचे स्वतःचे ज्ञानव्यूह अधिक संपन्न केले. आज विचार–व्यूहही 'आयात' किंवा अनुवादित स्वरूपातच येत आहेत. ('अमका अमुक म्हणाला, तमका तमुक म्हणाला...' पद्धतीने) अगदी 'स्त्रीवाद'ही याला अपवाद नाही.

आपल्यावर प्रभाव आहे, तो मुख्यत्वे इंग्रजी भाषेतील साहित्याचा आणि तत्त्वविचारांचा. अलीकडे ही जागा अमेरिकन साहित्याने आणि अमेरिकन विचारव्यूहांनी घेतली आहे. रशियन, फ्रेंच, जर्मन, स्पॅनिश, जपानी, इत्यादी भाषांतील वाङ्मयाची आपण आवश्यक ती दखल घेतलीच नाही. साहित्याची आणि जीवनविषयक चिंतनाची अनेकांगी वाढ होण्यास त्यामुळे अडचण निर्माण झाली. या अल्पसंतुष्टतेविषयी तक्रार फार पूर्वी वि.का. राजवाडे यांनी त्यांच्या 'कादंबरी'विषयीच्या विस्तृत विवेचनात केलेली होती. पुढे बा.सी. मर्ढेकरांनी हेच अधिक स्पष्ट करून म्हटले, की 'आपण इतके परपुष्ट आहोत, की पुरेसे परपुष्ट नाही.'

परभाषेच्या 'अर्ध्या हळकुंडी' संपर्काने स्वभाषा सध्या ग्रस्त झालेली दिसू लागली आहे. 'देशीपणा'चा आग्रह पुढे आला आहे तो या ग्रस्ततेला विरोध करण्यासाठीच. पण देशी व्यूह सुद्धा न पचवताच घेतले तर ते तरी स्वभाषेचे पोषण करू शकतील का?

**— अंजली सोमण**

# अनुवाद : शास्त्र, की कला?

अशोक रा. केळकर

## १. विषयाची प्रारंभिक उकल

१:१ अनुवाद आणि भाषांतर हे पूर्णतः समानार्थ शब्द नाहीत हे प्रथम लक्षात घ्यायला पाहिजे. भाषेची दोन अंगे मानता येतात : भाषाव्यवस्था आणि भाषाप्रयोग. भाषाप्रयोगाची सामान्यतः दोन अंगे समजली जातात. बोलणे-लिहिणे म्हणजे संदेशप्रेषण आणि ऐकणे-वाचणे म्हणजे संदेशग्रहण. मूल प्रथम समजून ऐकू लागते आणि मग समजून बोलू लागते. काही दिवसांनी त्याच्याकडून आणखी एक वाढीव अपेक्षा केली जाते. आई लहानग्याला म्हणते, 'बाबांना जाऊन सांग, जेवायला चला म्हणून.' मूल बाबांकडे जाऊन (अर्थातच वाटेत ते विसरले नाही तर) ऐकलेला मजकूर पुन्हा सांगते. हे त्याने आयुष्यात प्रथमच केलेले संदेशानुप्रेषण, यालाच पहिला अनुवाद म्हणायचे का? हे ठरवण्यासाठी आपल्याला दोन पावले मागे जायला पाहिजे.

संदेशाची दोन अंगे असतात—जे बोलले आणि ऐकू गेलेले अंग ते शब्दांग आणि जे योजले आणि समजले गेलेले अंग ते अर्थांग. म्हणजे संदेशप्रेषण, संदेशग्रहण, आणि संदेशानुप्रेषण यांना दोन दोन पातळ्या असतात.

(१) **संदेशप्रेषण :** अर्थांकन, मग शब्दांकन

**संदेशग्रहण :** शब्दग्रहण, मग अर्थग्रहण

**संदेशानुप्रेषण :** अर्थांकन, मग शब्दांकन

हंसा वाडकर 'सांगत्ये ऐका'चे अर्थांकन करते, दुसरा कुणी अरुण साधू त्याचे शब्दांकन करतो, आणि तिसरा कुणी त्यावरून अर्थग्रहण करतो—असे आपण म्हणतो खरे; पण वास्तविक ही सगळी आठ टप्प्यांनी होणारी क्रिया आहे.




पण समजा, हा जो दुसरा कुणी मध्यस्थ, त्याने हंसा वाडकरने सांगितलेले नुसते उतरवून काढले असते तर? 'स्वतःच्या शब्दांत' अनुप्रेषण न करता 'जसेच्या तसे' अनुप्रेषण केले असते तर? तर मग दोन टप्पे गळले असते.




आता (२) आणि (३) यांची तुलना केली, तर (२) मधले संदेशानुप्रेषण म्हणजे अनुवाद म्हणता येईल, तर (३) मधले अनुवाद नसून केवळ अनुप्रस्तुती म्हणावी लागेल. बाबांना निरोप सांगणाऱ्या मुलाने अनुवाद केला, की केवळ पुनरुक्ती म्हणजे अनुप्रस्तुती केली, हे मुलाच्या ठिकाणी अर्थसंक्रमण झाले किंवा तसे न होता मधले दोन टप्पे गळले का यावरून ठरवावे लागेल. संदेशानुप्रेषणाचे इतर मार्गांनीही प्रकार पडतात.

(४) **संदेशानुप्रेषण :**

अनुप्रस्तुती / अनुवाद
मौखिक / लिखित
समभाषिक / अन्यभाषिक

टीप : अन्यभाषिक अनुप्रस्तुतीचे उदाहरण म्हणजे मराठी 'केळकर'चे हिंदीमध्ये 'केळकर' करणे. मौखिक अन्यभाषिक अनुवादाला दुभाषेपण म्हणतात. अन्यभाषिक अनुवादक्रियेला भाषांतरक्रिया असेही म्हणतात. लक्षात घेण्यासारखी गोष्ट म्हणजे संस्कृतमध्ये अन्यभाषिक अनुवाद, ट्रान्स्लेशन याला स्वतंत्र शब्द नाही. भाषान्तरेण परिवृत् भाषान्तरमनुवादः अशासारखी  शब्दयोजना करावी लागेल.

अनुवाद 'स्वतःच्या शब्दांत' (स्वशब्दांकित) असल्यामुळे तो करतानां संक्षेप किंवा विस्तार करायला वाव असतो. असा संक्षेप किंवा विस्तार केलाच, तर तो साकल्याने करायचा, अशी अपेक्षा असते. पण समांकित अनुवाद करतानाही मूळ मजकुरात कुठे कुठे स्थानिक स्वरूपात संक्षेप किंवा विस्तार करायची मुभा अनुवादक कधीकधी घेतो.

(५) **अनुवाद : समांकित / संक्षेपित / विस्तारित**

आतापर्यंतच्या विवेचनावरून हे लक्षात आले असेल, की अनुवादनैपुण्य, अनुवादक्रिया, अनुवादफलित ही अनुक्रमे सर्वसामान्य भाषानैपुण्य, भाषाप्रयोग, भाषाप्रयोगफलित (पाठ्य, टेक्स्ट) यांचीच अंगे आहेत. जर कुणाच्या अंगी दोन भाषांत नैपुण्य असले, तर अन्यभाषिक अनुवाद हा त्या नैपुण्याचाच स्वाभाविक आविष्कार आहे. भारत किंवा यूरोप यांसारख्या बहुभाषी भाषाक्षेत्रांत तर ही गोष्ट अधिकच प्रत्ययाला येते. अनुवाद हा जाताजाता, झटपट केलेला आणि कामचलाऊ असेल किंवा मुद्दाम, विशिष्ट हेतू मनात धरून केलेला असेल. असा सहेतुक अनुवाद कधी त्वरेने करावा लागतो (उदाहरणार्थ, वाटाघाटीतले दुभाषेपण, वृत्तपत्रातल्या बातम्या तयार करणे) तर कधी कच्चा खर्डा–पक्का खर्डा करायला अवसर असतो.

(६) **अनुवाद : साहजिक/त्वरित-सहेतुक/सायास-सहेतुक**

**टीप :** सहेतुक अनुवाद करणारा हौशी असेल किंवा व्यावसायिक असेल.

इथून पुढे आपण मुख्यतः सहेतुक अन्यभाषिक अनुवाद समोर ठेवून विवेचन करणार असलो, तरी त्यातून निघणारे निष्कर्ष बऱ्याच अंशी समभाषिक अनुवाद आणि साहजिक अन्यभाषिक अनुवाद यांनाही लागू पडतील. मात्र अनुवाद हे शास्त्र की कला हा प्रश्न सहेतुक अनुवादाला अनुलक्षूनच उपस्थित होतो, साहजिक अनुवाद मात्र केवळ एक स्वाभाविक

आविष्कार ठरतो.

१:२ संस्कृतमध्ये जशी शास्त्र (किंवा विद्या) आणि कला (किंवा शिल्प) ही जोडी आहे, तशीच ग्रीकमध्ये episteme आणि tekhne ही जोडी आहे आणि लॅटिनमध्ये scientia आणि ars ही जोडी आहे. ह्या तीनही जोड्यांमध्ये काही समान सूत्र सापडते.

(७) परिस्थिती किंवा प्रसंग समजून घेणे आणि हाताळणे यासाठी जाणत्या माणसाला ज्याप्रमाणे कला उपलब्ध असते, त्याचप्रमाणे शास्त्रही उपलब्ध असते. मात्र–

(क) शास्त्रात सुस्पष्ट गृहीतांपासून तर्कबुद्धीने निर्णय घेतला जातो. तर कलेत वास्तवाच्या दीर्घ परिचयामधून अंतःप्रज्ञेने आणि तारतम्यबुद्धीने निर्णय घेतला जातो.

(ख) शास्त्रासाठी नियम आत्मसात् करून त्यांचे पालन करण्याची तयारी आवश्यक असते, तर कलेसाठी नमुनेदार म्हणून स्वीकारलेल्या रीतीचे अनुकरण करण्याची व अंतिम साध्याविषयी जी काही कमी-अधिक अस्फुट कल्पना असेल तिच्या जोरावर समयसूचन (इंप्रोव्हायझेशन) करण्याची तयारी आवश्यक असते.

(ग) शास्त्रासाठी अनुभवामधून सामान्य तत्त्वे ओळखण्याची (ॲब्स्ट्रॅक्शनची, अपोद्धाराची) क्षमता लागते, तर कलेसाठी अनुभवाची धूसरता दूर करून त्यातली विलक्षणता ओळखण्याची (काँक्रीशनची, समूर्तनाची) क्षमता लागते.

(घ) शास्त्रामध्ये वस्तुस्थितीचा स्वीकार करण्याची वृत्ती असते, तर कलेमध्ये वस्तुस्थितीपासून पडेल तर फारकत घेण्याची वृत्ती असते.

(ङ) शास्त्रामध्ये नव्या अनुभवाशी सामना करताना मोजमापावर भिस्त असते तर कलेमध्ये अंदाजावर भिस्त असते.

इथून पुढच्या विवेचनात या जोड्यांची आपल्याला जागजागी आठवण व्हावी. या ठिकाणी तूर्त एक स्पष्टीकरण देणे जरुरीचे आहे. आज आपण ज्याला 'सायन्स' म्हणजे विज्ञान म्हणतो, ते पहिल्या ध्रुवाकडे झुकते आणि जिला 'आर्ट' म्हणजे ललितकला म्हणतो, ती दुसऱ्या ध्रुवाकडे झुकते. असे जरी असले, तरी सगळे शास्त्र विज्ञानाच्या कक्षेत येत नाही (उदाहरणार्थ, ग्रंथपालनाचे शास्त्र), की सगळी कला ललितकलेच्या कक्षेत येत नाही (उदाहरणार्थ, दुसऱ्याला वश करण्याची कला), अनुवादपद्धती शास्त्र ठरली तरी विज्ञान ठरत नाही, की कला ठरली तरी ललितकला ठरत नाही.

अनुवादक्रियेचे शास्त्र बसवता येईल, की ती कलाच राहते, अशी द्विधा का पडावी, हे

उमजण्यासाठी आपल्याला तिच्यामधली गुंतागुंत म्हणजे आलेख (२) सतत डोळ्यांसमोर ठेवायला पाहिजे.

### २ धोक्याची वळणे : होणारे अपघात : उपाय आणि पथ्य

**२:१** पहिले वळण म्हणजे 'शब्दग्रहण, → अर्थग्रहण,' (आलेख २ पाहा) हे वळण. अनुवादकाकडून मूळ मजुकराचे अर्थग्रहण सुयोग्य होत नाही. पुष्कळदा मूळभाषा अनुवादकाच्या पूर्णतः अधीन नसते (उदाहरणार्थ, इंग्रजीतल्या मजकुराचा आजचा मराठीभाषक अनुवादक, जुन्या मराठीतल्या मजकुराचा आजचा मराठीभाषक अनुवादक, कायद्याच्या भाषेतल्या मजकुराचा कायद्याविषयी अनभिज्ञ असलेला अनुवादक). किंवा पुष्कळदा मूळ मजकुराचा संदर्भ अनुवादकाला पुरेसा अवगत नसतो (उदाहरणार्थ, सार्वजनिक सभेत केलेल्या उत्स्फूर्त भाषणाचा अनुवाद करणारा परंतु तिथे हजर नसलेला वृत्तपत्रकचेरीतला कर्मचारी). किंवा कधीकधी अनुवादक मूळ संदेशप्रेषकाच्या अवघड किंवा संदिग्ध भाषासरणीला पुरे पडत नाही (उदाहरणार्थ, कांटच्या किंवा मर्ढेकरांच्या शैलीचा मुकाबला करणारा अनुवादक). किंवा कधीकधी अनुवादक सावध नसतो (उदाहरणार्थ, अनुवादक त्वरेने काम करणाच्या तणावाखाली आहे, दमणूक किंवा विमनस्कता यांच्या ताणाखाली आहे, फाजील आत्मविश्वास किंवा नको असणाऱ्या कामाबद्दलची नाराजी यामुळे निष्काळजी आहे).

मराठीभाषक अनुवादकाने इंग्रजी minister शब्दाचे मराठी भाषांतर 'धर्मोपदेशक' न करता भलत्या संदर्भात 'मंत्री' केले किंवा संस्कृत 'हेतु' शब्दाचे इंग्रजी भाषांतर cause न करता purpose केले किंवा जुन्या मराठी 'कपाट' शब्दाचे अर्वाचीत मराठी भाषांतर 'दार' न करता 'कपाट' केले, तर अनुवाद प्रामादिक होईल. का, तर मूळपाठ्याचे अर्थग्रहण प्रामादिक असल्यामुळे तो प्रामादिक झाला असावा असे अनुमान निघते. मर्ढेकरांच्या 'येउं दे वाणीत माझ्या । सूर तूझ्या आवडीचे' या ओळींचे (**आणखी काही कविता** : कविता१) इंग्रजी भाषांतर 'let my voice/Bear the tunes you/Love' (दिलीप चित्रे) असे करायचे, की 'And let my voice do sing/The notes of my love for you' (अशोक केळकर) असे करायचे, हा प्रश्न मुख्यतः 'तुझ्या आवडीचे' या शब्दांच्या अर्थग्रहण,बद्दलचा प्रश्न आहे.

असले घोटाळे टळण्यासाठी अनुवादकाच्या ठायी मूळभाषेत उत्तम नैपुण्य असायला पाहिजे, निदान त्या भाषेत संदेशग्रहण त्याला उत्तम रीतीने करता यायला पाहिजे. कधी

अनुवादकाला मूळभाषा स्वभाषा म्हणून येत असते, निदान ती स्वभाषेइतकी उत्तम येत असते (उदाहरणार्थ, मराठी मुलखात स्थायिक असलेला एखादा कन्नडभाषक किंवा कोकणीभाषक) अशी स्थिती नसली, तर मात्र अनुवादकाने मूळभाषा ज्याची स्वभाषा आहे, अशा व्यक्तीला मदतनीस म्हणून घेणे इष्ट ठरेल. (कधी मूळपाठ्याचा कर्ता अशी मदत देऊ करतो. मदतनिसाला अनुवादभाषा अवगत असण्याची गरज नाही.) स्वतःला मूळभाषा उत्तम अवगत असणे किंवा तशा मदतनिसाचे साहाय्य घेणे हे जसे महत्त्वाचे, त्याचप्रमाणे मूळ पाठ्याचा विषय अवगत असणे महत्त्वाचे. अनुवादक मूळपाठ्यामधील विषयामधला जाणता असला, तर उत्तमच. तसे नसले, तर अनुवादक त्या विषयातल्या जाणत्याची मदत घेऊ शकतो, निदान पारिभाषिक संकल्पनाकोशाची किंवा पारिभाषिक संज्ञाकोशाची मदत घेऊ शकतो. जिथे मूळभाषा प्रचलित नाही (उदाहरणार्थ, अभिजात फार्सी, पुराणमराठी सन १००० ते ११५० कालखंडातली, मध्यमराठी सन ११५० ते १८२० कालखंडातली), तिथे अर्थातच जाणत्याची किंवा शब्दकोशाची आणि व्याकरणाची मदत घ्यावीच लागेल, अनुवादक स्वतःच जाणता असला, तरी देखील कुठेकुठे घ्यावी लागेल. मूळपाठ्य ज्या परंपरेमध्ये आहे, ती परंपरा किंवा मूळचा भाषाप्रयोग ज्या संदर्भात घडला तो प्रसंग, निदान त्या प्रसंगासारखे इतर प्रसंग यांच्याशी अनुवादकाचा परिचय असायला पाहिजे. जितका हा परिचय गाढ, तितके चांगले, परिचयाबरोबर आत्मीयता असली, तर फारच चांगले. उलटपक्षी, आपल्याला जी कविता, जो कवी, जी काव्यपरंपरा भावत नाही, त्यांच्या वाटेला अनुवादकाने न जावे, हे बरे.

२:२ दुसरे वळण म्हणजे 'अर्थग्रहण$_1$ → अर्थांकन$_2$' हे वळण. अनुवादकाकडून मूळभाषेतील अर्थांकन$_1$ याला अनुवादभाषेतील अर्थांकन$_2$ यामधून न्याय मिळत नाही. दोन्हींकडचे अर्थ आणि त्या त्या अर्थांमधून सूचित होणारे प्रसंग, यांचा मेळ बसत नाही. असे का व्हावे? काही दोष अनुवादकाचा आहे, काही नाठाळपणा मूळभाषा आणि अनुवादभाषा या विशिष्ट भाषाजोडीचा आहे. काही दोष सोनाराचा आहे, काही सोन्याचा.

पुष्कळदा असे दिसते, की अनुवादक्रियेत अर्थग्रहण$_1$ कडून अर्थांकन$_2$ असे काही वेगळे वळण असल्याचे अनुवादकाच्या ध्यानात आलेलेच नसते. त्याच्या मनात अनुवादक्रियेचे चित्र असते, ते खूपच बाळबोध असते.

(८)



मूळचा संदेशप्रेषक अर्थांगाकडून शब्दांग$_1$ कडे जातो, अनुवादक मूळपाठ्य ग्रहण करताना शब्दांग$_1$ कडून अर्थांगापर्यंत परततो आणि नंतर हाती आलेल्या अर्थांगाकडून अन्य भाषेत शब्दांग$_2$ कडे जातो, नवा संदेशग्राहक मग शब्दांग$_2$ कडून फिरून अर्थांगापर्यंत परततो.

जणू काही अर्थांग हा एक ठाम भोज्याच आहे! जणू अर्थांगरुपी शरीराचा शब्दांग हा घालण्या-काढण्याजोगा पोशाखच आहे! जणू अनुवादक फक्त एक पोशाख उतरवून दुसरा चढवण्याचेच काम करतो!

(९)

गो { मराठी 'गाय' / कन्नड 'आवु'

अश्व { मराठी 'घोडा' / कन्नड 'कुदिरे'

पण मराठी 'घोडा' हा अश्व नसून बुद्धिबळातला अश्व किंवा बंदुकीला बसवलेला चाप असला, तर? तरी काही अडचण नाही, दोन्ही ठिकाणी कन्नडमध्ये 'कुदिरे' सुखाने चालतो. पण मग इंग्रजी 'horse' चे काय? तिथे बुद्धिबळात 'knight' चालतो, तर बंदुकीला 'cock' बसवलेला असतो, त्याचे काय? म्हणून काय झाले? इंग्रजी भाषा मराठीला सांस्कृतिक दृष्टीने अधिक परकी असल्यामुळे तपशिलात फरक पडतो, पण त्यामुळे 'शरीर-पोशाख-न्यायाला' बाध येत नाही. पण मग इंग्रजी 'cow' चे काय? म्हणजे असे, की मराठीत एखादे माणूस मुक्या गाईसारखे गरीब असते, तर इंग्रजीत मुक्या गाईसारखे निर्बुद्ध असते, त्याचे काय? गोत्व आणि मूकत्व यांची मराठीमधली आणि इंग्रजीमधली अर्थवलये भिन्न आहेत- गाय आणि cow यांची व्याप्ती किंवा मुके आणि dumb यांची व्याप्ती एकच असूनही हे खरे आहे. पण मग शरीर-पोशाख-न्यायाला बाध येतो. एका भाषेकडून दुसऱ्या भाषेकडे जाताना अर्थांग 'तेच' राहत नाही, कमी-अधिक बदलते. साहजिकच अर्थग्रहण$_1$ कडून अर्थांकन$_2$ कडे जाताना अनुवादकाला धोक्याचे वळण पार करावे लागते. शब्द आणि अर्थ यांचा शब्दार्थसंबंध आपण कामचलाऊ अनुवादक्रियेत समजतो (उदाहरणार्थ, आलेख ८ पाहा) त्यापेक्षा कितीतरी अधिक निकटचा असतो. प्रत्येक भाषा विश्वाला जणू आपापला आकार देते. हे भान जर आले नाही, तर अनुवादक असे मानतो, की मूळपाठ्याशी इमान राखले,

म्हणजे झाले. (मराठी 'बोलूनचालून', इंग्रजी 'having talked and walked' पाशी त्याला ठेच लागते.) किंवा असे मानतो, की अनुवादभाषेशी इमान राखले, म्हणजे झाले (इंग्रजी 'hasn't got a penny' ऐवजी मराठीत '-पाशी तांबडा पैसा नव्हता' घालून भागेलही, पण 'dumb like a cow' ऐवजी मराठीत 'म्हशीसारखा मठ्ठ' म्हणून कितपत भागेल?) खरी गोष्ट अशी आहे, की अनुवादकावर ही दोनही इमाने एकाच वेळी राखण्याची मोठीच जबाबदारी असते. अनुवादकाचे काम नोहे येरा गबाळाचे!

ही जबाबदारी पार पाडायची, तर प्रत्येक भाषाजोडीची बात निराळी असते, विशिष्ट भाषायुग्माचे विशिष्ट प्रश्न असतात, हे अनुवादकाला स्वीकारावेच लागते. तो सावध राहिला नाही, तर अपघात होतात. कधी लक्षणवृद्धी झाल्यामुळे व्याप्तिसंकोच होतो, कधी लक्षणसंकोच झाल्यामुळे व्याप्तिवृद्धी होते, कधी लक्षणभ्रंश झाल्यामुळे व्याप्तिभ्रंश होतो. याची अनुक्रमे उदाहरणे द्यायची, तर--

(१०) (क) मराठी : शीर्षक निवडणे कौशल्याचे काम असते.
इंग्रजी : Choosing a title/heading/headline is a job calling for skill. (कोणताही पर्याय निवडला, तरी व्याप्तिसंकोच होतो.)
(ख) मराठी : युद्ध संपलं एकदाचं!
इंग्रजी : The war was over. (तणाव म्हणा, ताण म्हणा, निष्काळजीपणा म्हणा, कारण काही असो--अनुवादक 'at last!' असे काही जोडायला विसरला. त्यामुळे मूळपाठ्यातले 'एकदाचं' आणि उद्‌गारचिन्ह ही दोन्ही त्याच्या जाळ्यातून निसटली.)
(ग) इंग्रजी : He was sitting in the chair.
मराठी : तो खुर्चीत बसत होता. (व्याप्तिभ्रंश झाला आहे. ह्याचा ताळा घ्यायचा, तर मराठीचे इंग्रजीत उलट भाषांतर करून पाहावे. ते होईल. 'He was sitting down in the chair.' 'बसत' ऐवजी 'बसलेला' पाहिजे.)

(१०) (ग) वरून आणखी एक गोष्ट लक्षात येते, की अर्थांकन, बद्दल सावधगिरी बाळगताना अनुवादकाला याचे भान असावे लागते, की शब्दार्थसंबंध जसा 'गाय', 'शीर्षक', 'एकदाचं', 'बसणे' यांसारख्या कोशगत संज्ञांच्या ठिकाणी असतो, तसा घटमान भूत, कर्तृपद - क्रियापद- संबंध यांसारख्या व्याकरणगत रचना किंवा आरोही सुर, उद्‌गारचिन्ह यांसारख्या उच्चारणलेखनगत वैशिष्ट्ये यांच्या ठिकाणीही असतो. एका भाषेत जे कोशगत संज्ञेने काम होईल, ते दुसऱ्या भाषेत कोशगत संज्ञेनेच होईल असे नाही. उदाहरणार्थ, पुढील दोन

वाक्यांमधली क्रियापदाची निवड आणि वाक्यरचना लक्षात घ्या.

(११) इंग्रजी : I have two boys and a girl.
मराठी : मला दोन मुलगे आणि एक मुलगी आहे.

दुसऱ्या वळणावरचे अपघात टाळायचे, तर अखंड सावधानतेने मूळपाठ्य आणि अनुवादभाषा या दोन्हींशी इमानदारी राखावी लागते. कुठलाही अनुवाद खऱ्या अर्थाने 'स्वैर' नसतो. अगदी कामचलाऊ किंवा झटपट करायच्या अनुवादात देखील अर्थाचा अनर्थ होणार नाही, याची खबरदारी बाळगावी लागते. उलटपक्षी, अगदी काळजीपूर्वक करायच्या अनुवादात देखील तडजोड करावी लागते. कधी मूळपाठ्याशी इमान राखताना अनुवादभाषेमध्ये तडजोड करावी लागते. संस्कृत 'अद्वैत'चे भाषांतर नेमके व्हावे, यासाठी इंग्रजीत 'nonduality' असा नवा शब्द पाडावा लागतो; 'nonviolence' ही अशीच एक तडजोड इंग्रजीभाषकांनी आत रुजू करून घेतली आहे, त्यामुळे दर पाळीला धावाधाव करावी लागत नाही. कधी अनुवादभाषेशी इमान राखताना मूळपाठ्याशी तडजोड करावी लागते. मराठी 'मामा' शब्दाचे 'maternal uncle' किंवा 'mother's brother' हे मराठी-इंग्रजी कोशात ठीक वाटणारे भाषांतर बाजूला ठेवून, कधी 'uncle' एवढाच शब्द ठेवून लक्षणसंकोच आणि व्याप्तिवृद्धी पत्करावी लागते. 'बोलूनचालून'चे 'having talked and walked' हे भाषांतर जितके हास्यास्पद आहे, तितकेच 'मामा, मला बरोबर ने ना!' याचे 'O maternal uncle, take me along, no?' हे भाषांतर हास्यास्पद ठरेल. अखेर अशा भाषांतरामुळे धड मूळपाठ्याशी सुद्धा इमान राखले जात नाही. कारण अशा भाषांतरामुळे परभृत भाषाप्रयोगात जे अर्थग्रहण होणार (आलेख-३ पाहा), ते मूळच्या भाषाप्रयोगातील अर्थांकन पाहता भलतेच ठरणार. मूळपाठ्याची प्रसंगानुकूलता (भाचा मामाकडे लाडाने हट्ट करतो आहे) पार हरवून जाते. त्यापेक्षा 'uncle, do take me along!' हे भाषांतर किती तरी सरस–जरी हा 'uncle' म्हणजे चुलता, आत्याचा किंवा मावशीचा नवरा नसून मामा आहे, हे स्पष्ट झालेले नाही तरी. अनुवाद हा भाषेचाच स्वाभाविक अविष्कार आहे. खुद्द मराठी भाषेत तरी 'चुलता', 'भावजय' या संज्ञांना या प्रसंगी वापरता येईल का? 'चुलत्या/भावजयी, मला बरोबर ने ना!' हे सामान्यतः कुणी म्हणणार नाही, म्हटलेच कुणी, तर त्यामुळे अभावित किंवा भावित विनोदनिर्मिती होईल. मराठी 'मृत्युपत्र', हिंदी 'इच्छापत्र', आणि उर्दू 'वसीयतनामा' हे शब्द एकमेकांचे स्वाभाविक अनुवाद ठरतात, तिन्हींचे लक्षण सारखेच ('आपल्या मृत्यूनंतर मिळकतीचा वारसा इच्छेनुसार ठरवणारा दस्तऐवज'), व्याप्ती एकच, प्रसंगानुकूलता सारखीच, तिन्हींना कायद्याचा वास येतो, पण या तीन भाषा आताच कंसात दिलेल्या

लक्षणाचा वेगळा अंश अधोरेखित करतात हा फरक राहतोच; आणि तशाच एखाद्या प्रसंगी मूळपाठ्य आणि अनुवादपाठ्य यांमध्ये पडणारी ही तफावत जाणवेल सुद्धा. पण म्हणून 'मृत्युपत्र'चा हिंदी अनुवाद 'मृत्युपत्र' असा करायला गेलो, तर हिंदी वाचकाला ते मृत्युदंडाचे अधिपत्र (डेथ वॉरंट) वाटायचे! अनुवाद मूळपाठ्याला अगदी चिकटून राहू दे, असा भाबडा आग्रह धरला, तर मूळपाठ्याचा अर्थच गमावण्याची पाळी येते!

२:३ तिसरे वळण म्हणजे 'अर्थांकन$_2$ → शब्दांकन$_2$' हे वळण. अनुवादकाकडून अनुवादपाठ्यामधील शब्दांकन$_2$ सुयोग्य होत नाही. पुष्कळदा अनुवादभाषा अनुवादकाच्या पूर्णतः अधीन नसते. उदाहरणार्थ, मराठीवरून इंग्रजीत अनुवाद करणारा मराठीभाषक असला, तर मराठीत नसलेले 'आर्टिकल' इंग्रजीत a, an, the असे घालायचे त्याला भान रहात नाही किंवा त्याने ते तसे घातले, तर ते यथास्थित नसते; आणि मराठीत असलेले 'का', 'ना' इंग्रजीत कधीकधी गाळावे लागतात, याचे भान त्याला राहत नाही.

(१२) मराठी : मी त्याला विचारले, की 'तू कोठे राहतोस?'
इंग्रजी : I asked him where he lived.
किंवा 'Where do you live?', I asked him.
याऐवजी *I asked him that where he lived. किंवा *I asked him, 'Where you live?'

या ठिकाणी तारांकित अनुवादातले इंग्रजी प्रामादिक आहे. कधीकधी या मराठीभाषकाला आपण केलेला इंग्रजी अनुवाद प्रामादिक नसला, तरी प्रसंगानुकूल नाही याचे भान नसते.

(१३) मराठी : माझे डोळे निळे आहेत.
इंग्रजी : I have blue eyes. किंवा My eyes are blue.
पहिला अनुवाद नेहमीसाठी, तर दुसरा विशेष प्रसंगी अनुकूल ठरेल. इंग्रजीवरून मराठीत अनुवाद करणारा इंग्लिशभाषक अशीच चूक करू शकेल.

(१४) इंग्रजी : I have blue eyes.
मराठी : माझे डोळे निळे आहेत.
किंवा : माझे निळे डोळे आहेत.
याऐवजी * मला निळे डोळे आहेत.

तारांकित अनुवाद प्रामादिक असला, तरी 'मला काय डोळे नाहीत?' अशा प्रकारची वाक्ये मराठीत आढळतात, हेही खरे आहे. तसेच इंग्लिशभाषकाने time चा अनुवाद करताना चुकीने पुंलिंगी 'वेळ' ऐवजी स्त्रीलिंगी 'वेळ' शब्द वापरला किंवा स्त्रीलिंगी 'वेळ' ऐवजी पुंलिंगी 'वेळ' शब्द वापरला, तर नवल वाटायला नको.

कधीकधी मात्र हा प्रश्न अनुवादभाषा अनुवादकाच्या नीट अधीन नाही, याचा नसतो. 'मूळभाषेतील अमुक शब्दाला अनुवादभाषेत प्रतिशब्दच मिळत नाही, मग शब्दांकन$_2$ कसे करणार?' असा हा सवाल असतो. मराठी 'खरकटे'साठी कुणाला हिंदी प्रतिशब्द 'सकरा' माहीत नसला, तर ते समजू शकते, तो माहीत करून दिला की अडचण दूर होईल. पण मराठी 'उष्टे' आणि 'खरकटे' यांना इंग्रजीत प्रतिशब्दच नाही, त्याला काय करणार? पण कोशकाराला अशा शब्दांमुळे कुंठित होऊन चालणार नाहीत, मात्र आपण केलेला अनुवाद सुटसुटीत असावाच, असे कोशकारावर बंधन नसते!

(१५) उष्टे : touched with one's lips or tongue and so considered polluted for another, who is not one's spouse or very young offspring–said of food, spoon, mouthpiece of a wind instrument, or the like

(१६) खरकटे : in the nature of or in contact with boiled or roasted cereal or pulse and so not fit to be offered to another who is one's ritual superior without being a member one's commensal group–said of food, food container, serving dish, or the like

ज्या इंग्लिशभाषकांचा मराठीभाषकांच्या खाण्यापिण्याविषयीच्या संकेतांशी परिचय झाला आहे, त्यांच्या बाबतीत अनुभव असा आहे, की 'खरकटे' त्यांना कधीच समजत नाही आणि 'उष्टे' समजले, तर त्यासाठी अन्नाच्या संदर्भात 'not okay' आणि चमचा इत्यादींच्या संदर्भात 'dirty' यांसारखे प्रतिशब्द वापरून ते काम भागवतात. हे आणि असे मराठी शब्द इंग्रजीत उलगडून सांगणारे कोश आज तरी उपलब्ध नाहीत, ही वस्तुस्थिती आहे. (अशा प्रकारचा उलगडा देण्यासाठी कोशकाराला मराठीबरोबर इंग्रजीही उत्तम यावे लागेल, हे जाता जाता सांगावेसे वाटते. वेळ-पुंलिंगी आणि वेळ-स्त्रीलिंगी यांचा उलगडा इंग्रजीत अवश्य करून बघण्यासारखा आहे.) यापेक्षा 'विडी' शब्दाचा प्रश्न सोपा आहे. तुम्ही 'leaf cigarette' म्हणू शकता किंवा 'bidi' ही हिंदी शब्दाची अनुप्रस्तुती इंग्रजीने स्वीकारली आहे, याचा लाभ उठवू शकता. दोन भाषा खूप जवळ असतात, तेव्हा अनुवाद आणि अनुप्रस्तुती यांत फरक करणे

अवघड आहे. ('मेरे पास दो कलम हैं' असे कुणी बोलला, तर तो हिंदीत बोलला, की उर्दूत, हे कसे ठरवायचे?) विशेष नामांच्या बाबतीत हा अनुप्रस्तुतीचा संकेत पुष्कळदा स्वीकारला जातो. ('Mediterranean Sea' चे मराठीत 'भूमध्य समुद्र' होते पण 'Pacific Ocean' चे मराठीत 'पॅसिफिक महासागर' होते, हिंदीतल्याप्रमाणे 'प्रशांत महासागर' होत नाही.)

शब्दांकन, ला आणखीही एक पैलू आहे. त्यासाठी आपल्याला मर्ढेकरांच्या पूर्वी उल्लेखिलेल्या 'येऊ दे वाणीत माझ्या। सूर तुझ्या आवडीचे' या ओळींकडे पुन्हा वळणे उपयुक्त ठरेल. 'तुझ्या आवडीचे' याचे अर्थग्रहण, '(that) you love' या चालीवर करायचे, की 'love for you' या चालीवर करायचे, असा प्रश्न आपण उपस्थित केला होता. 'तुझ्या आवडीचे' याचा प्रकरणसंदर्भ म्हणजे कवितेतले मागचे-पुढचे शब्द, किंबहुना सगळी कविताच आणि कवितेचा प्रसंगसंदर्भ म्हणजे उदाहरणार्थ, तिचे मर्ढेकरांच्या इतर कवितांशी आणि पूर्ववर्ती तुकारामादी कवींच्या कवितांशी असलेले अनुबंध या सगळ्याची छाननी केल्यानंतरही समजा, प्रश्न अनिर्णीत राहिला, तर काय करायचे? याचे एक उत्तर असे असू शकते, की मर्ढेकरांना दोन्ही अर्थ अभिप्रेत आहेत किंवा अधिक नेमके बोलायचे, तर संदेशग्राहकाने कोणताही अर्थ ग्रहण केला, तर त्यांची ना नाही. असे असले, तर 'bearing your love' अशा प्रकारचे मूळच्यासारखेच संदिग्ध शब्दांकन, केले, तर ते युक्त ठरणार नाही का? आपण मूळपाठ्याशी इमान या मागणीचा अधिक लक्षणवृद्धियुक्त अर्थ इथे लावत आहोत. केवळ मूळपाठ्याचे अर्थांकन, नव्हे, तर त्याचे शब्दांकन, देखील अनुवादभाषेत शब्दांकित करायची वाढीव आकांक्षा अनुवादकाने बाळगावी, असे आपण सुचवत आहोत. ज्या मूळच्या भाषाप्रयोगात सहेतुक भाषासरणी म्हणजे शैलीचे महत्त्व असते, त्यात मूळच्या शैलीचेही भाषांतर व्हायला पाहिजे, 'शैल्यंतर' व्हायला नको. असे शैल्यंतर झाले, तर त्या प्रसिद्ध इटॅलियन म्हणीतला टोमणा अन्यभाषिक अनुवादकांना आणखीनच लागू पडतो.

(१७) इटॅलियन : त्रादुत्तोरे त्रादित्तोरे.
मराठी : भाषांतरकर्ता हा विश्वासघातकी असतो.
किंवा : भाषांतरकर्ते तेवढे घातकर्ते.

इटॅलियन भाषेतील मूळ पाठ्याला प्रासयमकामुळे आणि अल्पाक्षरत्वामुळे जो चटकदारपणा आला आहे, तो पहिल्या मराठी पर्यायामध्ये नाही, पण तो दुसऱ्या पर्यायात साधण्याचा प्रयत्न केला आहे. (मूळच्या एकवचनी नामांच्याऐवजी बहुवचनी नामे घातली, ते अनुवादभाषेच्या प्रकृतीशी इमान राखण्यासाठी–'भाषांतरकर्ता तेवढा घातकर्ता' हे वाक्य मराठी कानांना तेवढे

बरोबर लागत नाही.) हे साधण्यासाठी अनुवादक स्वतःवर काही बंधने पुष्कळदा लादून घेतो–अनुवाद वाक्यशः, पदशः, फार काय 'अक्षरशः' करायचा; पद्याच्या बाबतीत तर अनुवाद पद्यमय, समश्लोकी, फार काय समपंक्ती करायचा, मूळपाठ्यामधला पदक्रम जमेल तितका अनुवादपाठ्यात टिकवायचा. 'अद्वैत'चे भाषांतर 'identity' करता येईल, परंतु ते 'nonduality' असे पदखंडशः करण्यामागे तीच मूळपाठ्याशी अधिक पिळाचे इमान राखण्याची भूमिका आहे. जणू काही आपण अनुवादक्रियेचा आपला आलेख थोडासा बदलून घेत आहोत. (आलेख २ आणि १८ तुळा.)




दुसऱ्या आणि तिसऱ्या वळणावरचे अपघात टळण्यासाठी अनुवादकामध्ये अनुवादभाषेत, निदान संदेशप्रेषणात, उत्तम नैपुण्य असले पाहिजे; आणि दोन्ही भाषांच्या प्रकृतींमधला फरक त्याला लक्षात आलेला पाहिजे. साधारणतः असा आडाखा आहे, की अनुवादभाषा ही अनुवादकाची स्वभाषा असावी, म्हणजे विविध प्रकारचे भाषाप्रयोगाचे प्रसंग अनुवादभाषेत कसे हाताळतात, हे त्याला अवगत असेल. अनुवादभाषा अनुवादकाची स्वभाषा नसली किंवा अनुवादभाषा विशिष्ट प्रसंगी किंवा विशिष्ट विषयासाठी किंवा विशिष्ट परंपरेत कशी हाताळतात, हे त्याला अवगत नसले, तर कधी तो योग्य तो मदतनीस घेऊ शकतो. (मदतनिसाला वा विषयातल्या जाणत्याला मूळभाषा अवगत असण्याची गरज नाही.) शिवाय तो शब्दकोशाची आणि व्याकरणाची मदत घेईल–विशेषतः तौलनिक शब्दकोशाची किंवा तौलनिक व्याकरणाची.

बोलता बोलता आपण चवथ्या वळणावर आलो.

**२:४** चवथे वळण म्हणजे 'शब्दग्रहण$_{२}$ → अर्थग्रहण$_{२}$' हे वळण. इतका वेळ आपण अनुवादकाच्या डोक्यावरचे जबाबदारी ओझे क्रमाक्रमाने वाढवीत चाललो आहोत–त्याने

मूळपाठ्याचे अर्थग्रहण चोख करावे, अनुवादपाठ्याचे अर्थांकन आणि शब्दांकन चोख करावे, आता तर आपण म्हणून चुकलो, की त्याने मूळपाठ्याचे शब्दग्रहणही चोख करावे. म्हणजे पर्यायाने आपण अनुवादपाठ्याच्या ग्रहणकर्त्याचे कोडकौतुक करीत आलो, की काय? कोडकौतुक अवश्य, फाजील लाड नाही. चवथ्या वळणावरचे धोके टाळायचे आहेत, ते अनुवादकाने नाही, तर अनुवादपाठ्याच्या श्रोत्याने किंवा वाचकाने. त्याने फाजील लाडांची अपेक्षा ठेवली, तर अपघात नक्कीच होतील. काही उदाहरणांनी हा मुद्दा स्पष्ट करता येईल.

समजा, मूळपाठ्य शास्त्रीय विषय सामान्य संदेशग्राहकाला सुलभ भाषासरणीत समजावून देते आहे आणि तेही यशस्वी रीतीने. त्याचा अनुवाद तशाच सुलभ भाषासरणीत असावा, अशी अपेक्षा श्रोत्याने किंवा वाचकाने ठेवली, तर ते रास्त होईल. वाजवी कोडकौतुक ते हेच. उलटपक्षी, मूळपाठ्य शास्त्रीय विषय जाणत्या संदेशग्राहकाला नेमकेपणाने आणि निस्संदिग्धपणे समजावून देते आहे आणि हे साधण्यासाठी पारिभाषिक भाषासरणी वापरली गेली आहे. त्याचा अनुवाद अतिसुलभ भाषासरणीत असावा अशी अपेक्षा ठेवणे म्हणजे फाजील लाडांची अपेक्षा ठेवणे ठरेल, ती रास्त अपेक्षा ठरणार नाही.

मूळच्या भाषाप्रयोगात संदेशग्राहकाला मूळभाषा उत्तम रीतीने अवगत आहे, बहुधा ती त्याची स्वभाषाच आहे, असे गृहीत धरले असले, तर परभृत भाषाप्रयोगातही संदेशग्राहकाला अनुवादभाषा उत्तम रीतीने अवगत असल्याचे गृहीत धरायला नको का? उदाहरणार्थ, अर्थग्रहण$_1$ करताना मूळचा ग्रहणकर्ता प्रकरणसंदर्भ आणि प्रसंगसंदर्भ यांच्या मदतीने संदिग्धतेचा निरास करतो किंवा संक्षिप्त शब्दांकनाचा विस्तार करून घेतो. हीच क्रिया अर्थग्रहण$_2$ होताना का घडू नये?

(१९) इंग्रजीत suit चे अर्थ सूट आणि खटला असे दोन्ही होतात.

पुढील वाक्ये मूळपाठ्यात आली काय किंवा अनुवादपाठ्यात आली काय, अपघात होण्याचे कारण नाही.

Why file a suit? (खटला का भरायचा?)
Why wear a suit? (सूट का घालायचा?)
Why press a suit? (खटला का लावून धरायचा?/ सुटाला इस्तरी का करायची?)

तिसऱ्या वाक्यासाठी अर्थात प्रसंगसंदर्भाची गरज आहे, कारण इथला प्रकरणसंदर्भ

(विशेषतः press हे क्रियापद) पुरे पडत नाही.

(२०) मराठीत 'त्यानं मला' या उत्तराचे विचारलेल्या प्रश्नाला अनुसरून 'त्यानं मला बोलावलं/सांगितलं/दिलं' असे विविध अर्थ होऊ शकतील.

मर्ढेकरांच्या मूळ ओळी वाचताना मराठीभाषक वाचकाला संदिग्धता जाणवत नसेल किंवा जाणवली, तरी बोचत नसेल, तर अनुवादपाठ्यात तशीच संदिग्धता आली, तर त्याच्या वाचकाने तक्रार कशाला करायची? या किंवा अशा साहित्य किंवा नाट्य या स्वरूपाच्या पाठ्यांच्या बाबतीत मूळपाठ्याच्या आणि म्हणून अनुवादपाठ्याच्या ग्रहणकर्त्याकडून केवळ भाषिक नैपुण्य अपेक्षित नाही, तर एक विशेष संवेदनक्षमता, कल्पनाक्षमता, सहानुभाव यांचीही अपेक्षा राहणार. ती नसली, तर अपघात होणार.

इथवरच्या विवेचनाचा सारांश सांगायचा, तर मूळपाठ्याच्या ग्रहणकर्त्याकडून ज्या कोणत्या कमी-अधिक अपेक्षा ठेवणे रास्त ठरेल (मग ते पाठ्य म्हणजे एखादी रस्त्यावरची पाटी असो, नाही तर एखादा तत्त्वज्ञानाचा ग्रंथ असो), त्याच अपेक्षा अनुवादपाठ्याच्या ग्रहणकर्त्याकडून सुद्धा ठेवणे रास्त ठरेल. त्या पुऱ्या झाल्या नाहीत (उदाहरणार्थ, मूळ भाषेशी निगडित निसर्ग, समाज, संस्कृती त्याला अगदीच माहीत नसला, तर?), तर अपघाताचा संभव राहतो आणि ग्रहणकर्त्याला मदतीची गरज लागते.

अनुवादपाठ्याच्या संदेशग्राहकाकडून थोड्या जास्तीच्या अपेक्षा ठेवायच्या का? साधे उदाहरण घ्यायचे, म्हणजे अर्थग्रहणाला मदत करणाऱ्या टिपा (उदाहरणार्थ, 'उष्टे' किंवा 'मुंज' किंवा 'डुक्कर' यांबद्दल सांस्कृतिक टिपा किंवा 'Tory' किंवा 'नवबौद्ध' किंवा 'चार्वाक' बद्दल सामाजिक टिपा) त्याने 'खपवून' घ्यायच्या का? उपनिषदांचा किंवा दाव-दे-चिंगचा किंवा बोदलेरचा इंग्रजीत अनुवाद करताना म्हणा, सॉफोक्लीजचा किंवा शेक्स्पियरचा किंवा कांटचा किंवा रिल्केचा मराठीत अनुवाद करताना म्हणा—त्या त्या अनुवादभाषा (इंग्रजी व मराठी) ताणल्या गेल्या, तर त्याने ती भाषेची ओढाताण 'सोसायची' का? दोन्ही प्रश्नांचे उत्तर 'काही एका मर्यादेपर्यंत होय' असेच द्यावे लागेल. 'कधीच नाही' असे उत्तर दिले, तर ते ग्रहणकर्त्याचे फाजील लाड ठरतील, एवढेच नव्हे, तर असे करणे त्याच्या बौद्धिक, भावनिक, नैतिक पोषणापासून त्याला वंचित ठेवील. मात्र अनुवादपाठ्याच्या ग्रहणकर्त्याचा मदतनीस ही भूमिका अनुवादक किंवा संपादक यांना कधी घ्यावी लागते. सगळे काही 'सोप्पे' आणि 'ओळखीचे' आणि 'पाळीव' कुणाला हवे असेल, तर अन्यभाषिक वाङ्मयाच्या वाटेला अशा

त्या आळशी आणि भित्ऱ्या आणि आत्मसंतुष्ट ग्रहणकर्त्याने जावे कशाला, आणि अशा ग्रहणकर्त्यासाठी अनुवादकाने खपखप खपावे कशाला? 'रामायण', 'महाभारत', 'ओथेलो'सारख्या पाठ्यांची रूपांतरे किंवा वैचारिक पाठ्याचे रसाळ चोथे यांना चटावलेल्या मराठी संदेशग्राहकांनी (गिऱ्हाइकांनी म्हणण्याचे माझ्या मनात येऊन गेले) आणि त्यांचे कोड पुरवणाऱ्या अनुवादकांनी जरा आत्मपरीक्षण करायला पाहिजे. (इंग्लंडमधला वाचक अठराव्या शतकात अशाच एका अवस्थेतून गेला. त्याला 'किंग्ज लियर'चा शेवट सुखमय करणारा अनुवाद करून मिळाला! त्या काळात अलेक्झँडर पोपने होमरच्या 'इलियड'चा इंग्रजी अनुवाद केला आणि रिचर्ड बेंटली या ग्रीक साहित्याच्या जाणत्याला दाखवला, त्यावर बेंटलीने त्याला फटकारले, "It is a pretty poem, Mr. Pope, but you must not call it Homer.")

चवथ्या वळणावर कच खाणारा आणखी एक अजिबात निराळ्या प्रकारचा अनुवादग्राहक आहे. त्याचा एकच घोशा असतो–समभाषिक किंवा अन्यभाषिक अनुवाद ही अशक्यप्राय गोष्ट आहे. कामचलाऊ किंवा गरजेपोटीचा अनुवाद तो 'चालवून' घेतो. पण सकस वैचारिक किंवा ललित वाङ्मयाच्या अनुवादाला–मग तो किती का विचारपूर्वक आणि मनःपूर्वक केलेला असे ना–तो कायम नाके मुरडत असतो. कोणत्याच पाठ्याला कोणत्याच अन्यभाषेत एक देखील खरा अनुवाद नसतो, असे त्याचे म्हणणे असते. याचा प्रतिवाद करणे जरूर आहे (असे नाक मुरडणे हा केवळ डौलीपणाचा भाग असेल तिथे प्रतिवादाची गरज नाही–आपण उलट नाक मुरडले, म्हणजे झाले! आपण गंभीर भूमिकेपुरताच विचार करू.) पहिली गोष्ट म्हणजे दोन मानवी भाषा नेहमीच परस्पर-अनुवाद्य असतात. हिंदुस्थानी संगीताचा 'अनुवाद' हिंदुस्थानी भाषेत करता येणार नाही, असे (किंवा याच्या उलट) म्हटले, तर शोभण्यासारखे आहे. पण एका भाषेतून दुसऱ्या भाषेत अनुवाद होणार नाही म्हणणे हा काय प्रकार आहे? हे नाकारण्याचे एक टोकाचे पर्यवसान म्हणजे 'आधुनिक विज्ञान इंग्रजीतून देशी भाषांत आणताच येणार नाही, मग ते देशी भाषांतून शिकवणार तरी कसे?' अशी भूमिका घेणे. प्रगत गणिताचा 'अनुवाद' नेहमीच्या भाषेत होणार नाही, असे कुणी म्हटले, तर ते विचार करण्यासारखे आहे; पण मग ते इंग्रजीलाही लागू पडणार आहे. गणिताची सूत्रे काही 'इंग्रजीत' लिहिलेली नसतात. दुसरी गोष्ट, म्हणजे दोन मानवी भाषा 'अन्ततोगत्वा' कधीच परस्पर-अनुवाद्य नसतात, असे कुणी म्हटले, तर ते विचार करण्यासारखे आहे–पण हा युक्तिवाद 'एकाच' भाषेत चालणारे संदेशप्रेषण आणि संदेशग्रहण यांनाही लागू आहे. अर्थांकन$_1$ मधला अर्थ नेमका 'तोच' अर्थांकन$_2$ मध्ये राहणार नाही, हे जितके खरे आहे, तितकेच हेही खरे आहे की अर्थांकन$_1$ मधला अर्थ नेमका 'तोच' अर्थग्रहण$_1$ मध्येही राहणार नाही. 'अन्ततोगत्वा' काय होणार, ते जाऊ दे, पण निदान काव्य तरी कधीच 'स्वशब्दवाच्य' नसते,

हे जर मान्य केले, तर ते समभाषिक काव्यग्रहणालाही लागू आहे. असे असूनही समभाषिक काव्यग्रहण करण्याच्या फंदात माणसे पडतात, एवढेच नव्हे तर त्यांना काव्याच्या अधिकाधिक जवळ जाण्याची शिकस्त करण्याची मुभा असते. तर मग ती मुभा अन्यभाषिक अनुवाद करणाऱ्याला का नसावी? रवींद्रनाथ ठाकुरांचे काव्य मुळातून वाचायला मिळावे, म्हणून बांगला भाषा शिकणाराची आपण नक्कीच पाठ थोपटावी, पण म्हणून त्याला मात्र 'नित्य खवा' खायला मिळेल आणि इतरांना 'रेवडीचा स्वाद' मात्र चाखावा लागेल, असे म्हणता येणार नाही.

सारांश, प्रत्येक पाठ्याला प्रत्येक भाषेत एक तरी अनुवाद असतो. फार तर तो 'व्यवहार्य' नसेल. 'उष्टे' अणि 'खरकटे' यांचे तौलनिक कोशात शोभणारे इंग्रजी अनुवाद आपण पाहिलेले आहेतच. (आलेख १५, १६ पाहा) आणखी एक उदाहरण पाहा.

(२१) मराठी : तू आपल्या बापाचा कितवा मुलगा आहेस?
हिंदी : अपने बाप के बेटों के अवस्थाक्रम में तेरे स्थान की क्रमसंख्या कितनी है?
किंवा : तू अपने बाप का कितने नंबर का बेटा है?
किंवा : तू अपने बाप का कौनसा बेटा है?
इंग्रजी : Your father's how manyeth son are you?

हिंदीमधला पहिला पर्याय (तू ऐवजी आप घातले तर) न्यायालयातल्या उलटतपासणीत सहज खपून जाईल. दुसरा पर्याय दोस्तांच्या बैठकीत खपून जाईल, तिसरा प्रसंगसंदर्भ खूप अनुकूल असला तर चालून जाईल. इंग्रजी अनुवाद तौलनिक व्याकरणाच्या चर्चेत खपून जाण्यासारखा आहे.

याच्या काहीशी उलट वाटणारी भूमिकाही आढळते, ती म्हणजे प्रत्येक पाठ्याला विवक्षित भाषेत एकच आदर्श अनुवाद असतो, इतर अनुवाद असलेच, तर ते कमी-अधिक प्रामादिक ठरणारे अनुवाद. पण या भूमिकेचा विचार पुढच्या छेदकात येईल.

### ३ परभृत भाषाप्रयोगाचा प्रसंग आणि अनुवाद

आतापर्यंत अनुवादक्रियेचा आपण वळणावळणांनी विचार केला. तो करताना पर्यायी अनुवादांमधून कोणते गाळावे, याचा काही बोध आपण घेतला. त्यासाठी काही निश्चित

निकष, निदान आडाखे आपल्या हाती आले. पण या चाळण्यांमधून जे पर्याय हाती राहतात, त्यांच्यामधून कोणता निवडावा, यासाठी काही बोध आपल्याला मिळालेला नाही. मूळपाठ्याशी इमान आणि अनुवादभाषेशी इमान ही केवळ सर्वसाधारण धोरणेच ठरतात. ते निश्चित निकष ठरत नाहीत.

अनुवादकाला (किंवा त्याला मदतनीस असला, तर त्याला) मूळपाठ्य आणि अनुवादभाषा यांचा एकत्र विचार करून प्रतिपाठ्य (किंवा प्रतिपाठ्ये) सुचतात. उदाहरणार्थ—

(२२) मूळपाठ्य इंग्रजी : His tastes are provincial.
मराठी प्रतिपाठ्य : त्याच्या अभिरुच्या प्रांतिक आहेत.

विचार केल्यावर लक्षात येते, की एकाच माणसाला एकाधिक अभिरुच्या असल्याचे मराठीभाषक सहसा म्हणत नाही, तेव्हा विचाराधीन प्रतिपाठ्य अनुवाद म्हणून प्रामादिक (छेदक २:३)

(२३) नवीन प्रतिपाठ्य : त्याची अभिरुची प्रांतिक आहे.
विचार करता : taste(s) च्या संदर्भात provincial चे अर्थग्रहण, प्रांतिक असे नसून आडगावाला साजेसे असे असणार. अनुवाद प्रामादिक, कारण मूळपाठ्य नीट समजले नाही (छेदक २:१) किंवा अनुवादभाषा नीट अवगत नाही (छेदक २:३).

(२४) नवीन प्रतिपाठ्य : त्याची अभिरुची आडगावाला साजेशी आहे.
विचार करता : अनुवाद सुयोग्य वाटतो, प्रतिपाठ्य मूळपाठ्याचा अर्थ अनुवादभाषेत स्थानिक विस्तार करून नीट उलगडून सांगते, प्रतिपाठ्य हे खरोखरीच अनुवादपाठ्य आहे. पण हे नवीन पाठ्य 'अनुवाद-मराठीत' असल्यासारखे तर नाही ना वाटत? मूळ provincial शब्दासाठी तसाच सुटसुटीत मराठी प्रतिशब्द नाही का?

(२५) नवीन प्रतिपाठ्य : त्याची अभिरुची खेडवळ आहे.
विचार करता : 'खेडवळ'मध्ये provincial चा अर्थ न येता rustic चा अर्थ येतो, असे नाही का वाटत? मूळपाठ्याचा अर्थ मराठी भाषेत एरवी स्वाभाविकपणे कसा व्यक्त होईल? मूळपाठ्यात निर्देशित झालेल्या 'तो'मध्ये शहरातल्या माणसाला साजेशी अभिरुची न दिसता जुनाट किंवा मागास अभिरुची दिसत असली, तर मराठीभाषक त्याला 'गावंढळ' नाही का

म्हणणार? (लक्षात ठेवण्याजोगी गोष्ट म्हणजे 'खेडवळ' आणि 'गावंढळ' यांमधला हा श्लेष अनुवादकाची मराठी ही स्वभाषा असली, तरच त्याला जाणवेल.)

(२६) नवीन प्रतिपाठ्य : त्याची अभिरुची गावंढळ आहे.

विचार करता : ठीक, (२४) आणि (२६) सुयोग्य अनुवाद वाटतात; पण (२३) आणि (२५) मात्र फक्त प्रामादिक प्रतिपाठ्ये वाटतात, ती अनुवाद वाटतच नाहीत. आता प्रश्न असा पडतो, की (२४) अणि (२६) या सुयोग्य ठरलेल्या अनुवादांपैकी कोणता अनुवाद अंतिम अनुवादपाठ्य म्हणून निवडायचा?

आपण ही जी अनुवादाचर्चा चालविली आहे त्यावरून विचारी, जबाबदारीने काम करणारा अनुवादक मनातल्या मनात कशा प्रकारे विचार करतो, त्याच्याबरोबर मदतनीस असला तर त्याच्याशी कशाप्रकारे चर्चा करतो, याची कल्पना यावी. अनुवादक जेवढा कुशल, जेवढा सराईत, तेवढी ही क्रिया झटकन होत असणार, हे लक्षात यावे. ही चर्चा आपण पुढे चालवण्याअगोदर म्हणजे अंतिम अनुवादपाठ्य निवडण्याअगोदर एका मुद्द्याची आपल्याला शहानिशा करायला पाहिजे.

(२७) प्रत्येक पाठ्याला विवक्षित अनुवादभाषेत एक तरी अनुवाद असतो. आता मुद्दा, असा की–

(क) असा अनुवाद एक म्हणजे एकच आदर्श अनुवाद असतो, इतर असलेच, तर केवळ विचारार्ह अनुवाद ठरतात अशी भूमिका घ्यायची? किंवा–

(ख) अंतिम अनुवादपाठ्य निवडण्यासाठी प्रथम एक किंवा अधिक निकष ठरवावे लागतात आणि जे निकष ठरवू त्यांनुसार हा किंवा तो अनुवाद अंतिम निवडीत हाती येईल, एकच एक आदर्श अनुवाद नसतो अशी भूमिका घ्यायची?

टीप : प्रामादिक प्रतिपाठ्ये हे तर अनुवादच नाहीत, तेव्हा त्यांचा विचार अंतिम निवडीत होण्याचे कारणच नाही.

या दोन भूमिकांपैकी पहिली भूमिका टिकण्याजोगी नाही. प्रत्यक्ष व्यवहारात सामान्यतः एकच अंतिम अनुवादपाठ्य निवडून काम चालवावे लागते, हे खरे. पण हे निवडलेले

अनुवादपाठ्य त्यात्या निकषापुरते आदर्श अनुवादपाठ्य ठरते. अशा निवडीच्या निकषांचे काही संच आहेत. एकेका संचातून कोणता निकष पक्का करायचा, हे आपण आपल्या विचारसरणीला आणि गरजेला धरून ठरवतो. प्रत्येक निकष-संच एकेका प्रश्नाभोवती फिरतो. यांपैकी सर्वांत महत्त्वाचा प्रश्न आपण प्रथम घेऊ.

(२८) अनुवादक्रियेचे केंद्रवर्ती प्रयोजन कोणते?

(क) मूळपाठ्याचे अर्थांकन अनुवादभाषेतील प्रतिपाठ्यामधून नीट उलगडून सांगणे, हे ते केंद्रवर्ती प्रयोजन. या निकषावर जो उतरेल तो आदर्श छायानुवाद.

(ख) मूळपाठ्याचे अर्थांकन अनुवादभाषेत एरवी स्वाभाविकपणे कसे झाले असते तसे प्रतिपाठ्यातून शब्दांकित करणे हे ते केंद्रवर्ती प्रयोजन. या निकषावर जो उतरेल, तो आदर्श भावानुवाद.

टीप : भाषाजोडी जेवढी अर्थांगदृष्ट्या आणि शब्दांगदृष्ट्या जवळची, तेवढी जो छायानुवाद, तोच भावानुवाद (किंवा जो भावानुवाद, तोच छायानुवाद) असे निघण्याची शक्यता जास्त–उदाहरणार्थ, हिंदी-उर्दू ही भाषाजोडी.

आता आपण आपल्यासमोरचे मूळपाठ्य (२२) आणि त्याचे दोन उपलब्ध सुयोग्य अनुवाद (२४) आणि (२६) यांचा या निकषांना अनुसरून विचार करू. आपल्या मते छायानुवाद करणे योग्य असेल किंवा आपल्याला छायानुवादाची गरज असेल, तर (२४) सरस ठरेल, तोच आदर्श छायानुवाद म्हणून निवडावा लागेल. उलट, आपल्या मते भावानुवाद करणे योग्य असेल किंवा आपल्याला भावानुवादाची गरज असेल, तर (२६) सरस ठरेल. आपण (२८) या संचातून निकष (क) मानतो, की निकष (ख) मानतो, यावर हे अवलंबून राहील. ('भगवद्गीते'वरची ज्ञानेश्वराची 'भावार्थदीपिका' ग्राह्य किंवा वामनाची 'यथार्थदीपिका' ग्राह्य, हा वाद भावानुवाद ग्राह्य, की छायानुवाद ग्राह्य, या प्रकारचाच तर वाद नव्हता?)

एखाद्या भाषाजोडीसाठी तौलनिक शब्दकोश रचताना मूळभाषेतील शब्दापुढे क्रमाने छायानुवाद आणि भावानुवाद दिले, तर अनुवादकाची मोठीच सोय होईल, यात शंका नाही.

(२९) उदाहरणार्थ :

(क) मामा : mother's brother : uncle





अनुक्रमणिका

(ख) उष्टे : touched with one's lips or tongue and so considered polluted for another, who is not one's spouse or very young offspring: mouth-polluted, dirty, not okay

आलेख (१७) मधील इटॅलियन म्हणीच्या दोन मराठी अनुवादांतून अंतिम निवड करताना आपण एका वेगळ्याच प्रश्नाला तोंड देत आहोत.

(३०) अनुवादक्रियेमधून निष्पन्न होणाऱ्या अनुवादपाठ्याचा मूळपाठ्याशी नेमका अनुबंध कोणता? परभृत भाषाप्रयोग हा किती परभृत ठेवायचा?

(क) मूळपाठ्याशी इमान राखण्याला जितकी प्राथमिकता तितके चांगले, परभृत भाषाप्रयोग हा परभृत राहणार हे खुलेपणाने मान्य करणे योग्य. (ताकाला जाऊन भांडं कशाला लपवायचं?) या निकषावर उतरेल, तो आदर्श परायत्त अनुवाद.

(ख) अनुवादभाषेशी इमान राखण्याला जितकी प्राथमिकता तितके चांगले, परभृत भाषाप्रयोग हा छुपेपणाने परभृत राहावा हे योग्य (अनुवाद अनुवादच वाटला नाही, तर किती चांगले!) या निकषावर उतरेल, तो आदर्श स्वायत्त अनुवाद.

म्हणजे आपल्याजवळ दोन वेगळे निकष-संच उपलब्ध झाले : छायानुवाद की भावानुवाद (२८), परायत्त अनुवाद की स्वायत्त अनुवाद (३०). उदाहरणार्थ –

(३१) मूळपाठ्य : त्रादुत्तोरे त्रादित्तोरे.

परायत्त छायानुवाद : भाषांतरकर्ता घातकर्ता.
स्वायत्त छायानुवाद : भाषांतरकर्ता हा विश्वासघातकी असतो.
परायत्त भावानुवाद : भाषांतरकर्ते तेवढे घातकर्ते.
स्वायत्त भावानुवाद : भाषांतरकर्ता कायम दगा

म्हणजे असे झाले, की उपलब्ध सुयोग्य अनुवादांना विशिष्ट निकष लावून अंतिम अनुवादपाठ्य निश्चित करण्यासाठी प्रथम त्या त्या निकष-संचातून निकष निवडण्याची गरज आहे. पण हे निकष निश्चित करण्यासाठी इतर काही प्रश्न उपस्थित करावे लागतील. उदाहरणार्थ–

(३२) (क) अनुवाद मौखिक/लिखित वाहिनीला अनुकूल आहे का?

(ख) अनुवाद समांकित/संक्षेपित/विस्तारित ठेवायचा आहे का?

(ग) अनुवाद साहजिक/त्वरित-सहेतुक/सायास-सहेतुक राहणार का?

परंतु अनुवाद कितपत प्रसंगानुकूल आहे हे जोखणे हा एक स्वतंत्रच विषय आहे. त्यामुळे सुयोग्य अनुवादांमधून अंतिम अनुवाद निवडण्याबद्दलची ही चर्चा इथेच थांबवू, आणि आपल्या मूळ प्रश्नाकडे आपण परत वळू.

**४ अनुवादक्रिया शास्त्रानुसार चालते, की कलेनुसार?**

आपला सुरुवातीचा प्रश्न होता तो म्हणजे : अनुवाद शास्त्र/विद्या की कला/शिल्प? त्यासाठी काही सूत्रही आपण निश्चित केले आहे—आलेख (७) आठवावा. अनुवादक्रियेचे स्वरूप आणि तिचा एकूण भाषाप्रयोगाची संबंध आपण गेल्या दोन छेदकांतून (२:१ ते ४ आणि ३) पाहिला. तेव्हा आता सुरुवातीच्या प्रश्नाचे उत्तर देणे जड जाऊ नये.

(३३) अनुवादक्रिया म्हणजे मुख्यतः अनुवादकाच्या मनातली निर्णयक्रिया.

(क) जेव्हा ही निर्णयक्रिया स्पष्टपणे आणि टप्प्याटप्प्याने पुढे सरकते, तेव्हा अनुवादक्रिया शास्त्रानुसार चालते.

(ख) जेव्हा ही निर्णयक्रिया अस्फुटपणे आणि 'झटिति' घडून जाते, तेव्हा अनुवादक्रिया कलेनुसार चालते.

यांपैकी नेमके केव्हा काय होते हे, निर्णयक्रियेचा टप्पा कोणता, अनुवादक कसा, मूळपाठ्य कसे, भाषाजोडी कशी, परभृतभाषाप्रयोग कसा या सगळ्यांवर अवलंबून असते. सामान्यतः शास्त्र आणि कला या दोन्हींची कमी-अधिक सरमिसळ होते.

हीं सरमिसळ अजिबात टाळून अनुवादक्रिया (निदान तिच्यामधले बरेचसे निर्णय) पूर्णतः शास्त्रानुसार चालणे शक्य असते, त्याप्रसंगी ती संगणकाच्या हवाली करता येते. उलटपक्षी, काव्याचा अनुवाद करणे हे सगळयांत नाठाळ घोडे!

# अनुवादविषयक काही पारिभाषिक संज्ञांची इंग्लिश-मराठी सूची

ही मुख्यतः प्रस्तुत लेखात वापरलेल्या संज्ञांची सूची आहे. काही संज्ञा केवळ अनुवादविषयक नसून अधिक सामान्य स्वरूपाच्या आहेत. इंग्रजी संज्ञा देतांना दोन संक्षेप वापरले आहेत l. (language), t. (translation).

abstraction अपोद्धार
acceptable t. सुयोग्य अनुवाद
alert सावध
amateur translator हौशी अनुवादक
ambiguity संदिग्धता
art 1 कला, शिल्प
2 ललितकला, कला
assistant मदतनीस, सहायक
bilingual dictionary तौलनिक शब्दकोश
carelessness निष्काळजीपणा
casual t. साहजिक अ.
channel वाहिनी
concretion समूर्तन
condensation संक्षेपक्रिया, संक्षेपित अनुवाद
context संदर्भ
contrastive grammar, translative grammar तौलनिक व्याकरण
coping समाचरण, हाताळणी
criterion (बहुवचन criteria) निकष
decoding t. छायानुवाद
definition, extension लक्षण, लक्षणबोध
deliberative t. सायास-सहेतुक अनुवाद
dependent t. परायत्त अनुवाद





अनुक्रमणिका

different-language अन्यभाषिक
display आलेख
draft खर्डा
elaboration, expansion विस्तार क्रिया, विस्तारित अनुवाद
equipollent t. समांकित अनुवाद
erroneous replica text प्रामादिक प्रतिपाठ्य
formulation अर्थांकन
global साकल्ययुक्त
ideal t. आदर्श अनुवाद
improvisation समयसूचन
independent t. स्वायत्त अनुवाद
intertranslability परस्पर-अनुवाद्यता
language मानवी भाषा, भाषा
l. area भाषाक्षेत्र
l. pair भाषाजोडी, भाषायुग्म
l. skill भाषानैपुण्य
l. system भाषाव्यवस्था
l. use primary & secondary भाषाप्रयोग मूळचा व परभृत
local स्थानिक
message संदेश
message production संदेशप्रेषण
message reception संदेशग्रहण
message reproduction संदेशानुप्रेषण
message transmission संदेशसंक्रमण
notional interpretation 1 अर्थांक
2 अर्थांग
oral t., interpretership मौखिक अनुवाद, दुभाषेपण
other l. परभाषा
own l. स्वभाषा
paraphrasing 1 अनुवादक्रिया
2 समांकित अनुवादक्रिया

professional translator व्यावसायिक अनुवादक
range, extension व्याप्ती, व्याप्तिबोध
reencoding t. भावानुवाद
reformulation 1 अनुवादक्रिया, अनुवाद
2 अनुवादफलित
rendition शब्दांकन
replica term प्रतिशब्द
replica text प्रतिपाठ्य
rerendition, phonic t. अनुप्रस्तुति, पुनरुक्ती
same-language समभाषिक
science 1 शास्त्र, विद्या
2 विज्ञान
sign function in language शब्दार्थसंबंध
simultaneous t., speeded t. त्वरित-सहेतुक अनुवाद
situational context प्रसंगसंदर्भ
source l. मूळभाषा
source text मूळपाठ्य
stress तणाव
target l. अनुवादभाषा, साध्यभाषा
target text अनुवादपाठ्य
technical dictionary पारिभाषिक संकल्पनाकोश
technical vocabulary पारिभाषिक संज्ञाकोश
tension ताण
text (reproduciable language use product) पाठ्य, भाषाप्रयोगफलित
textual context प्रकरणसंदर्भ
translation 1 अन्यभाषिक अनुवादक्रिया, अनुवाद, भाषांतरक्रिया
2 अन्यभाषिक अनुवादफलित, भाषांतर, अनुवाद
t. method अनुवादपद्धती
t. studies अनुवादविद्या
translator अनुवादक, भाषांतरकर्ता
understanding आकलन, समज

verbal manifestation शब्दांग
verbal recognition शब्दग्रहण
verbal transmission शब्दसंक्रमण
version पाठ्यांतर
working t. कामचलाऊ अनुवाद
worthy of consideration विचारार्ह
written translation लिखित अनुवाद.

७ धनंजय, ७५९।८३ भांडारकर रस्ता गल्ली, पुणे ४११ ००४

**अनुवादक्रियेचे धिंडवडे**

... मूळ इंग्रजी संहिता जशीच्या तशी इंग्रजी लिपीत किंवा देवनागरी लिपीत उतरवून काढणे व अधूनमधून तीतल्या काही मजकुराचे अशुद्ध, चुकीच्या मराठीत भाषांतर करणे म्हणजे महान कलाकृतीचा अनुवाद अशी कल्पना दिसते. कारण 'ॲना कॅरेनिना' सारख्या जगद्विख्यात कलाकृतीचा अनुवाद वाचताना हाच अनुभव येतो. हा अनुवाद करणाऱ्या कोणी एक ललिता गौरी कवली आहेत.....अनुवाद सिद्ध करताना कधी मराठी तर कधी मूळ इंग्रजी भाषा वापरली आहे.

प्रत्येक छापील पृष्ठावर किमान एक वाक्य तरी मूळ कादंबरीतले जसेच्या तसे इंग्रजी लिपीत उतरवून काढण्याचा लेखिकेने विक्रम केला आहे.

ट्रॅजिडी, डिअर, सिंपल, हॉरिबल, रिफ्लेक्स ॲक्शन, व्हॉट, स्प्लेंडिड, हाऊ, यस, नो, हबग, रिस्पेक्ट, प्रॉब्लेम, विंटर, समर, गुडनेस्, हेल्प, टीच, एन्ट्री, फ्रेंड सर्कल, एक्झॅक्टली या आणि अशा किमान १०० हून अधिक शब्दांना मराठी प्रतिशब्द ....बाईंना ठाऊक नाहीत याचे नवल वाटते. कॉन्व्हेंटमध्ये जाणारी मुले देखील याहून शुद्ध मराठी वापरीत असतील...

जेथे लेखिकेने मराठीत अनुवाद न करता मूळ मजकूर देवनागरीत लिहिलाय तिथे तर धमालच केली आहे. मूळ कादंबरीत नायक सैन्याच्या पलटणीत (कॅडेट कोअरमध्ये) जातो कोअर शब्दाचे स्पेलिंग corps लेखिकेने त्याचा उच्चार कॉर्प्स केटन आहे. कॉर्प्स उच्चार केला तर त्याचा अर्थ प्रेत असा होतो.....

— **श्रीविजय**

('सत्याग्रही विचारधारा' एप्रिल १९९३, पृ. १६).

# अनुवाद आणि समीक्षा

विरूपाक्ष कुलकर्णी

१९७५ ते १९९१ या सुमारे पंधरा-सोळा वर्षांच्या कालावधीत सुप्रसिद्ध कन्नड लेखक डॉ. शिवराम कारंत यांच्या सात कादंबऱ्या मराठीत अनुवादित झाल्या. त्यांची मराठी नावे अशी :

१. मिटल्यानंतर २. मुकज्जी ३. अशी धरतीची माया ४. तनमनाच्या भोवऱ्यात ५. चोमा महार ६. डोंगराएवढा; आणि ७. कुडिय.

हे अनुवाद वेगवेगळ्या अनुवादकांनी केले असून, साहित्य अकादमी, नॅशनल बुक ट्रस्ट, कॉंटिनेंटल प्रकाशन, मेहता प्रकाशन, चंद्रकला प्रकाशन या संस्थांनी ते प्रकाशित केले आहेत. या सर्व अनुवादांवर मराठीमध्ये बऱ्याच ठिकाणी लिहिले गेले. डॉ. सुधाकर देशपांडे यांनी 'आलोचने'त लिहिलेले सातही कादंबऱ्यांवरील सविस्तर लेख (यापैकी 'कुडिय'वरील लेख प्रकाशित झालेला नाही) आणि कै. प्रभाकर पाध्ये यांनी 'सकाळ' मध्ये लिहिलेला 'मुकज्जी' आणि 'तनमनाच्या भोवऱ्यात' यांवरील एक लेख हे यांपैकी महत्त्वाचे लेखन म्हणता येईल.

आपण अनुवादित केलेल्या कादंबऱ्यांवरील महत्त्वाची समीक्षा मूळ लेखकाला कन्नडमध्ये अनुवादित करून पाठवायची, या आमच्या प्रथेप्रमाणे या लेखांचे अनुवाद करत असताना काही गोष्टी लक्षात आल्या. डॉ. सुधाकर देशपांड्यांच्या सर्व लेखांचे कन्नड अनुवाद करत असताना असे लक्षात आले, की अनुवादकांच्या गफलतींमुळे किंवा अतिउत्साहामुळे समीक्षकाने केलेली काही विधानेही गफलतीची ठरतात! त्याच गफलतींचा हा एक ओझरता आढावा घेण्याचा प्रयत्न.

इथे एका गोष्टीचा प्रथमच स्पष्टपणे खुलासा करणे अत्यावश्यक आहे. यातील मुद्दे मुद्दाम शोधायचे, म्हणून खोडसाळपणे शोधलेले नाहीत. मीही एक अनुवादक असल्यामुळे केवळ कृतीशी तपासत जाऊन 'चुका' शोधल्या, तर ते किती अयोग्य ठरेल, याची मला पूर्ण कल्पना आहे. कारण ललित कलाकृतीचा जिवंत अनुवाद व्हायचा असेल, तर तो 'शब्दशः' अनुवाद असता कामा नये, असे माझेही मत आहे.



अनुक्रमणिका

समीक्षा-लेखनाचा अनुवाद करताना ज्या मुद्द्यांवर समीक्षकाने गफलतीने विधाने केली आहेत किंवा ज्या गोष्टींचा कादंबरी-आकलनावर परिणाम झाला आहे, तेवढ्याच मुद्द्यांचा इथे विचार केला आहे.

(जाता-जाता सांगायचे, म्हणजे डॉ.द.दि. पुंडे यांच्या पुढाकाराने प्रसिद्ध झालेल्या या समीक्षा-लेखांच्या कन्नड अनुवादाचे पुस्तक ''कारंतर कादंबरिगळु - महाराष्ट्रियर दृष्टियल्लि''- 'कारंतांच्या कादंबऱ्या - महाराष्ट्रीयांच्या दृष्टीतून' या नावाने ९१ साली प्रसिद्ध होऊन त्याची पहिली आवृत्ती १९९२ च्या मे-जून मध्येच संपली.)

**कादंबऱ्यांची शीर्षके :**

या सातही कादंबऱ्यांपैकी 'मिटल्यानंतर' आणि 'तनमनाच्या भोवऱ्यात' ही नावे मूळ नावांचे सरळ-सरळ अनुवाद असल्यामुळे त्यामुळे काही गफलती झालेल्या नाहीत. पण इतर पाचही नावांच्या बाबतीत असे म्हणता येणार नाही.

मुकज्जी - या कादंबरीचे मूळ नाव 'मुकज्जिय कवसगळु' म्हणजे 'मुकज्जीची स्वप्ने' असे आहे. कै. प्रभाकर पाध्ये यांनी आपल्या **'सकाळ'** मधील 'आभाळातली अभ्रे' या सदरात लिहिताना या कादंबरीवर मुख्य आरोप केला आहे, तो या कादंबरीमध्ये 'सेंद्रिय एकात्मता' नसल्याचा. मराठी नावामुळे त्यांचे लक्ष त्या मुकज्जी या व्यक्तीवर केंद्रित झाल्यामुळे तिची दिवसा दिसणारी स्वप्ने त्यांना विसंगत वाटली असावीत. पण मूळ कन्नड नाव त्या स्वप्नांवरच भर देते आणि त्यांची संगती विशिष्ट प्रकारे लागत गेल्यामुळे कदाचित लेखकाची या आरोपातून मुक्तता होण्याचाही संभव आहे.

'अशी धरतीची माया' - या कादंबरीचे मूळ नाव 'मरळि मण्णिगे' असे आहे. याचा शब्दशः अनुवाद 'परतून/वळून मातीकडे/गावाकडे' असा होईल. तीन पिढ्यांची कथा सांगणाऱ्या विस्तीर्ण कालपट असलेल्या या कादंबरीतील पहिली पिढी गावात राहून शेती हा व्यवसाय निष्ठेनं करत असते, दुसरी पिढी आंग्ल शिक्षण आणि अर्धवट नव्या विचारांमुळे भरकटलेली आहे आणि तिसऱ्या पिढीतील राम एताळ हा सुशिक्षित - सुसंस्कृत अरुण मुंबईमध्ये दुसऱ्या महायुद्धाच्या काळातील मंदीमुळे पुन्हा गावाकडे परततो, असे दाखवले आहे. मराठी अनुवादाच्या नावामधील 'माया' या शब्दामुळे राम गावी परततो, ते धरतीच्या मायेमुळे, असे काहीसे ध्वनित होते. १९८४ मध्ये पुणे विद्यापीठात साहित्य अकादमीने या कादंबरीवर चर्चासत्र आयोजित केले होते. त्या चर्चेच्या वेळी स्वतः कारंतांनी आपल्याला अशी कुठली

'माया' अभिप्रेत नसल्याचे सांगितले होते. 'जर रामच्या पोटापाण्याची मुंबईला सोय झाली असती, तर तो 'माये'पोटी गावी आला नसता. त्याला नोकरी मिळाली नाही, तेव्हा गावातल जमिनीने त्याचा तो प्रश्न मिटवला, एवढेच-' असे त्यांचे म्हणणे. हे त्यांच्या व्यक्तिमत्त्वाशी आणि विचारसरणीशी सुसंगतच आहे. पण समीक्षक म्हणतो –

''त्याला (रामला) नोकरी न मिळाल्यामुळे तो गावी माघारी परततो व शेती करायला लागतो. शेतीचा व्यवसाय सोडलेलं एक घराणं पुन्हा धरतीच्या मायेच्या आसऱ्याला परत येते. इथवर एक वर्तुळ पूर्ण होते.''

याचप्रमाणे 'हात उंचावून/खुणावून स्वतःकडे बोलावणाऱ्या धरतीकडे परत जाणं' वगैरेही समीक्षकाने म्हटले आहे. 'धरतीचं लेकरू होऊन परतणं,' 'आपल्याला मातीची ओढ असते, तशी मातीलाही आपल्याबद्दल ओढ असते–' वगैरे वाक्येही इथे आली आहेत, त्याला ही शीर्षकातील 'माया'च जबाबदार दिसते.

'डोंगराएवढा' – या कादंबरीचे मूळ नाव 'बेट्टद जीव' म्हणजे डोंगरातला जीव असे आहे. त्या नावामुळे गोपालय्या या डोंगरावर राहणाऱ्या नायकाचा परिचय होतो. प्रथमदर्शनी मराठी नाव योग्य वाटले, तरी यावरील लेख वाचताना काही गोष्टी लक्षात येतात. 'डोंगराएवढा' या नावामुळे एक उत्तुंग व्यक्तिमत्त्व आधीच गृहीत धरले जाते. त्यामुळे गोपालय्यांचे व्यक्तिमत्त्व कादंबरी वाचता-वाचता वाढले पाहिजे, हे आधीच मनात ठसते. त्यामुळे त्यांच्या भोवतालची माणसं अधिकच खुजी वाटून कादंबरीतील सहजता कमी होते काय, हा प्रश्न आहे. कारण डॉ. देशपांडे या लेखांत लिहितात,

'गोपालय्यांचे पात्र डोंगराएवढे होण्यासाठी बाकीची पात्रे कमी उंचीची असणे अपरिहार्य आहे.'

'चोमा महार' – मूळ नाव 'चोमन दुडि' म्हणजे चोमाची दुडि. दुडि हे एक वाद्य असून कादंबरीतील चोमा हा महार आपली सुख-दुःखं वगैरे सर्व भावनांच्या आविष्कारासाठी हे वाद्य वाजवतो; आणि त्या तालावर आपल्या कुटुंबीयांना नाचायला लावतो- काही वेळा एकटाच वाजवत राहातो. हे वाद्य त्याच्या जीवनाचा एवढा मोठा भाग आहे, म्हणूनच या शीर्षकातही त्याचा उल्लेख आला आहे. मराठी शीर्षकात त्याऐवजी 'महार' आले आहे. चोमाच्या वाट्याला आलेलं दुःख त्याच्या 'महार'पणातून आलं असलं, तरी तेवढंच मांडणं एवढाच या कादंबरीचा विषय नाही. त्याच्या काही श्रद्धा- अंधश्रद्धा, समाजाला बंडखोर

वाटणारे त्याचे काही विचार वगैरेंमुळेही त्याच्या वाट्याला दुःखे आली आहेत. पण शीर्षकामुळे त्याचे 'महार'पण अधोरेखित होते आणि कादंबरीच्या इतर बाजू दुर्लक्षिल्या जातात, की काय, असे वाटते.

'कुडिय' - या कादंबरीचे मूळ नाव 'कुडियर कूसु'. म्हणजे 'कुडियांचं बाळ'. ही कादंबरी कुडिय समाजातील करिया या मुलाची आपल्या आजोबांचा गुरिकार (टोळीचा प्रमुख) हा अधिकार प्रतिकूल परिस्थितीत मिळवण्याची कथा आहे. ह्या कथेची पार्श्वभूमी कुडिय या समाजाची आहे, हे खरं असलं, तरी मराठी नावावरून वाटते, तशी ती कुडिय समाजाची डॉक्युमेंटरी नाही.

**भाषा**

या सर्व कादंबऱ्या एका लेखकाच्या असल्या, तरी अनुवाद वेगवेगळ्या अनुवादकांनी केल्यामुळे प्रत्येक अनुवादकाची भाषा वेगवेगळी असणे स्वाभाविकच आहे. पण यांतील कुडिय, चोमा महार या कादंबऱ्या खेड्यात किंवा प्रत्यक्ष जंगलात घडतात. या कादंबऱ्यांच्या भाषांविषयी डॉ. देशपांडे यांनी आपले विचार मांडले आहेत. त्यांनी 'कुडिय' वरील लेखात (हा लेख अजून प्रसिद्ध झालेला नाही.) अनुवादिकेच्या भाषेविषयीच्या सावधपणाचा उल्लेख केला आहे. त्याचबरोबर काही ठिकाणी या कुडिय लोकांच्या तोंडी आलेले 'कथा', 'पापी', 'क्षमा' यांसारखे त्यांच्या तोंडी न शोभणारे शब्द दाखवून दिले आहेत. अनुवादकाने ठेवलेल्या या त्रुटीविषयी त्यांनी अनुवादिकेलाच जबाबदार ठेवले आहे, हे बरे झाले! पण त्यांचा अनुवादिकेवरचा दुसरा आक्षेप मात्र मूळ लेखकाच्या लेखनशैलीचा विचार करता मान्य करता येण्यासारखा नाही. कुडियांचे सगळे संवाद मूळ कन्नडमध्ये आणि मराठी अनुवादातही कुडियांच्या बोलीत किंवा तो फील देण्यासारखे हवेत, असे त्यांना वाटते. त्याच प्रमाणे 'चोमा महार' मध्ये अनुवादिकेनं तशी भाषा वापरल्याचे ते कौतुकही करतात.

इथे एका गोष्टीचा खुलासा करायला पाहिजे. डॉ. कारंत या परिसरात सर्वत्र पायी हिंडून इथल्या समाजात मिसळून वावरले आहेत. त्यांना येथील लहान-मोठ्या समाजाच्या बोलीभाषा येतात. वक्तृत्वामध्ये ते त्या भाषा वापरतातही. पण लिखाणासाठी मात्र त्यांनी सर्वत्र प्रमाणभाषेचाच वापर केला आहे. त्यामागे वाचणाऱ्याला समजावं, असा त्यांचा दृष्टिकोन आहे आणि तो त्यांनी अनेक मुलाखतींमधून आणि आत्मचरित्रातून व्यक्त केला आहे. 'चोमा महार'च्या अनुवादिकेने अनुवाद प्रभावी होण्यासाठी जाणीवपूर्वक तसा वापर केला असेल, तर गोष्ट वेगळी. पण 'कुडिय'च्या अनुवादिकेनं तसं न करणं हे चुकीचं म्हणता येणार नाही.

या निमित्ताने एक प्रश्न उपस्थित होतो. अनुवादकाने मूळ लेखकाच्या भाषा-शैलीत कितपत स्वातंत्र्य घेणे योग्य आहे?

**प्रादेशिकता**

ललित कलाकृतींच्या अनुवादाच्या वेळी नेहमीच हा प्रश्न उपस्थित होतो. जर अनुवादाच्या दोन्ही भाषांमध्ये संस्कृती आणि भू-प्रदेशाचे फारच अंतर असेल, तर ही अडचण अधिकच वाढते. कन्नड-मराठी अनुवादात या अडचणीचे प्रमाण तुलनेनं कमी असते. तरीही काही अडचणी अपरिहार्य ठरतातच.

चोमा महार मधेल दुडि हे एक उदाहरण. अनुवादिकेने अत्यंत कष्ट घेऊन त्यासाठी 'डवरी' हा शब्द/वाद्य शोधले आहे. प्रस्तावनेत ती वाजवून भीक मागितली जाते, असा खुलासाही दिला आहे. पण भीक मागण्यासाठी वाजवण्याचे वाद्य आणि दक्षिण कन्नड जिल्ह्यातील महारांचा विरंगुळा म्हणून वाजवली जाणारी दुडि एक होऊ शकत नाहीत. दोन्हींमधला प्रादेशिकतेमुळे असलेला फरक तसाच राहतो. तीच गोष्ट या प्रदेशातील 'पंजुर्ली' भुताचीही आहे. येथील भूताराधना हा फार मोठा ग्रंथविषय होऊ शकेल, असा विषय आहे. ह्या भुतांविषयीच्या येथील लोकांच्या भावना 'देवा' पेक्षा आणि आपल्याकडील भुतांपेक्षा वेगळ्या असतात. त्यांचा पूजाविधीही वेगळा असता. त्या ठिकाणी आपल्या 'वेतोबा' ला ठेवून चालेल काय?

'तनमनाच्या भोवऱ्यात' मध्ये गुडियार नावाच्या चंदन आणि हस्तिदंती कारागिरी करणाऱ्या समाजाच्या त्याच नावाने उल्लेख केला आहे. तो योग्य दिसतो.

काही ठिकाणी मूळ लेखकानेही अनुवादकांना मदत केली आहे. 'डोंगराएवढा' मध्ये गोपालय्या 'कायिहुळि' या खाद्यपदार्थाचे कौतुक करतात आणि पुढे ती कशी करायची, याची हसत खेळत कृतीही सांगतात. संभाषणातून हा तपशील आल्यामुळे तळटीपेमुळे होणारा रसभंगही इथे होत नाही.

अनुवादकाने घेतलेले स्वातंत्र्य - सर्वच क्षेत्रांप्रमाणे वाङ्मयाच्या क्षेत्रातही चोऱ्या होत असतात. मग 'प्रभाव' किंवा 'स्फूर्ती' यांच्या आड त्या दडवल्या जातात. जेव्हा कलाकृतीचा अनुवाद किंवा भाषांतर केले जाते, तेव्हा मात्र तिथे मूळ कलाकृतीचे नाव आणि लेखकाचे नाव असणे आवश्यक आहे. केवळ नावच नव्हे, तर कलाकृतीशीही प्रामाणिकपणा अपेक्षित

आहे.

पण ललित कलाकृतीच्या अनुवादाच्या वेळी यात आणखी एक अडचण येते. केवळ शब्दशः-जशाचा तसा अनुवाद करणे रसहानी करणारे ठरते. त्यामुळे अनुवादकाला केवळ तेवढे करून चालत नाही. पण म्हणून आपल्या मनोधर्माप्रमाणे अशा कलाकृतींमध्ये काही भर घालणे किंवा स्वातंत्र्य घेऊन काही भाग वगळणे कितपत योग्य आहे?

काही वेळा अनुवादक असे स्वातंत्र्य घेतो आणि त्यावर गंभीर समीक्षा करणारा कादंबरीचा अभ्यासक त्यासाठी मूळ लेखकाला जबाबदार धरतो. या लेखामध्ये डॉ. देशपांड्यांच्या ज्या समीक्षा-लेखांचा आधार घेतला आहे, त्यांमध्ये अशा प्रकारचे अनुभव आले, ते इथे देत आहे.

'चोमा महार' मधील एक प्रसंग. चोमाची दोन मुलं शेतमजुरांबरोबर बेळतंगडी गावात मळ्यावर राबण्यासाठी निघाली आहेत. दुपारचं उन्ह चढल्यावर स्वयंपाक-जेवण-विश्रांतीसाठी सगळं एका नदीकाठी थांबतात, सावलीत ताणून देतात. 'काही उन्हात झोपले, तर काही वाटेवरच झोपले. काहीजण सावलीत झोपले. तर काहीजण झोपले सावलीत; पण जागे झाले उन्हात' यानंतर मराठी पुस्तकात वाक्य येते-'कसलं उन्ह आणि कसली सावली! श्रमजीवी शेतमजूर असला क्षुद्र भेदभाव मनात बाळगत नाही.' यावर समीक्षक 'अशा प्रकारचे उपहासगर्भित वाक्य इथं अनावश्यक होतं', असे म्हणतात. लेखाचा अनुवाद करत असताना वाक्य पाहू गेले असता हे वाक्य मूळ कादंबरीत लेखकाने लिहिलेले नाही, असे दिसून आले. (मराठी पृ. ३१)

ह्या तांड्याचा पुढील प्रवास सुरू होत असताना रात्री त्यातील एक मुलगी मरण पावते. तिला तिथेच माती देऊन निघताना रात्र होते. येथे मराठी अनुवादात वाक्य येते, 'आभाळात नुकताच उगवलेला चंद्र मात्र या दरिद्रीनारायणांची तारांबळ पाहून फिदीफिदी हसत होता.' (पृ. ३४) 'ही टिप्पणी तर फार रसहानी करणारी आहे', असं समीक्षक लिहितात. मुळात 'चंद्र या गरिबांचं जीवन बघून हसत होता -' एवढेच आहे आणि कादंबरी-लेखनाचा कालखंड (इ.स. १९३०-३२) पाहता ते समजण्यासारखे आहे.

याच क़ादंबरीतील आणखी एक प्रसंग. बेळ्ळी मन्वेलबरोबर प्रवास करत असताना 'निवेदकाला तेथील भोवतालच्या अपूर्व सृष्टिसौंदर्याचे वर्णन केल्याशिवाय राहवत नाही', असे म्हणून समीक्षक अनुवादातील उतारा देतात—'इथून पुढचा प्रवास तर जाणिवेतून नेणिवेच्या

दिशेनं होणारी वाटचाल! आता भोवताली दिसतं गर्द धुकं : गूढ अज्ञाताकडे नकळतच खेचून नेणारं! अनादी आणि अनंत. अन् त्यातून झिरपतो मंद धूसर संधिप्रकाश -अव्याहत' (पृ ८८). यावर समीक्षक म्हणतात-'सुटं करून पाहिलं, तर हे एक चांगलं भाष्यच आहे. पण इथे प्रश्न आहे, तो या कादंबरीतल्या संदर्भाचा! या प्रसंगाला अजिबात न जुळणारं असं हे वर्णन आहे. त्यामुळे निवेदक व पात्रं एकमेकांना आमने सामने ठाकत ह्या कादंबरीचं निवेदन दोन पातळ्यांवर (Two Tire) चालू राहणे हेच कलेला मारक ठरते.'

येथील मूळ कादंबरीतील वाक्य 'पुढे मात्र सर्व काही झाकलेल्या गूढ अशा विश्वात ढकलणारा धुक्यानं वेढलेला सकाळचा अंधार!' असे आहे.

'अशी धरतीची माया' मध्ये मात्र एके ठिकाणी अनुवादकाने लेखकाच्या लेखनकौशल्याचे समीक्षकाने कौतुक करावे, असे आपल्या पदरचे वर्णन घातल्याचेही आढळते. पृ. २४४ वरील संगीत-सभेच्या वर्णनात इथे येते 'त्यात करुणा होती, आर्जव होतं. दुःखाच्या अनंत छटा त्यात इंद्रधनुष्याप्रमाणे विखुरलेल्या होत्या. पण त्यात खंत नव्हती, बोच नव्हती-, या वर्णनामुळे नागवेणी या पात्राला आणखी उठाव आला आहे. मूळ कादंबरीत 'सुब्बराय समोर बसून ऐकत मान डोलावत होते. त्यांनी आजवर न ऐकलेलं माधुर्य आणि भावलहरी प्रकट होत होत्या', एवढेच आहे. पण मराठी वर्णनामुळे मूळ कादंबरीची आणि त्या व्यक्तिरेखेची लय बिघडत नाही.

**कादंबरीचे आकलन**

संपूर्ण कलाकृतीचे यथायोग्य आकलन ही अनुवादासाठी अत्यावश्यक गोष्ट आहे. काही कारणाने ह्यात अनुवादक अयशस्वी ठरला, तर संपूर्ण अनुवाद चुकीच्या पद्धतीने होणे शक्य आहे. काही वेळा या चुका संपूर्ण कलाकृतीवरच अन्याय करणाऱ्या असतात.

'मुकज्जी' ही कारंतांची ज्ञानपीठ पारितोषिक विजेती कादंबरी. सहावे ज्ञानेंद्रिय जागृत झालेल्या एका वृद्धेच्या आधारे आदिम काळापासूनचा इतिहास, समाजव्यवस्था, देव-धर्माच्या कल्पना आणि स्त्री-पुरुष संबंध उलगडून दाखवू पाहणारी ही कलाकृती आहे. ही मुकज्जी देव-धर्म, व्रत-वैकल्ये न मानणारी-एका अर्थी कारंतांचीच प्रतिनिधी आहे. भगवद्गीतेतील कृष्णाच्या तत्त्वज्ञानाच्या विधानावरही आक्षेप घेणारी-धर्माच्या नावाने सामोऱ्या येणाऱ्या विसंगती दाखवून देणारी. अनुवादामध्ये मात्र तिच्या तोंडी आत्मा - परमात्मा यांसारखे शब्द आले आहेत. 'झाडाभोवती फिरून आले' या ऐवजी 'प्रदक्षिणा' वगैरे शब्द आले आहेत.

सुब्बरायचे वडील मरण पावतात, तेव्हा ही वृद्धा त्याला मूळ कादंबरीत 'जा -जाळून ये' म्हणून सांगते. तर मराठी अनुवादात 'जा, क्रियाकर्म उरकून ये-' म्हणून सांगते. अशा वेळी मूळ कादंबरीचाच विपर्यास होऊन तिचा प्रभाव नष्ट होऊन जाण्याची शक्यता आहे.

'मुकज्जी' मध्ये एके ठिकाणी वाघ आणि गाईच्या कथेचा संदर्भ आहे. पण मराठीमध्ये जो भाग दिला आहे (काटछाट करून), त्यामुळे ती कथा स्पष्ट होत नाही आणि त्यातून मुकज्जीला काय म्हणायचे आहे, तेही समजत नाही. समीक्षकाने आपल्या लेखात याचा उल्लेख केला आहे.

तीच गोष्ट याच कादंबरीतील 'वाकडे डोळे' या कादंबरीच्या कथानकाची आहे. कन्नडमधील या शीर्षकाचा अनुवाद 'तिरपी नजर' असा काहीसा करता येईल. कारण या कादंबरीच्या कथानकाच्या निमित्ताने लेखकाला करमणूकप्रधान कादंबऱ्यांची टर उडवायची आहे. हे नेमकेपणाने समजून त्यातील उपहास समजून घेऊन हा अनुवाद होणे अपेक्षित असते. त्या विशिष्ट कथानकाचा आणि शीर्षकाचा परस्परांशी काहीही संबंध नाही, हेही मूळ लेखकाला इथे जाणीवपूर्वक दाखवायचे आहे.

**इतर :**

अनुवादामध्ये विविध त्रुटी राहण्यास अनुवादक जबाबदार असतो, असे आपण मानतो. पण काही वेळा वेगळेच घडते. दोन भाषांपैकी एक भाषा अनुवादकाची मातृभाषा असते आणि दुसरी भाषा त्याला काही प्रमाणातच येत असते. (याला काही सन्माननीय अपवाद असतीलही.). त्या वेळी अनुवादक आपले हस्तलिखित कुणा तज्ज्ञाकडे देतो. हा तज्ज्ञ मूळ कलाकृती आणि लेखक, त्याची लेखन-पद्धती या कशाचाही विचार न करता 'दुरुस्त्या' करत जातो. काही वेळा 'प्रकाशक' हे करवून घेतात. परिणामतः मूळ लेखक कृतीचे पुरेसे प्रतिनिधित्व करणारा अनुवाद वाचकांच्या हाती पडत नाही.

'तनमनाच्या भोवऱ्यात' विषयी तर न लिहिलेलेच बरे, इतका मुद्राराक्षसाचा धुडगूस मराठी अनुवादात आहे! 'दीप होता साक्षीला!' ऐवजी 'दीप होता साडीला!' अशा अक्षरशः शेकड्यांनी चुका मराठी अनुवादात आहेत. त्यामुळे अनुवादिकेचे दोष झाकून जाऊ शकतात.

'अनुवादाची समीक्षा' हा विषय देखील अनुवादाच्या क्षेत्रात महत्त्वाचा ठरतो, हे यावरून लक्षात येईल. या सर्व चर्चेनंतर एक मुद्दा उपस्थित होईल- अशा परिस्थितीत अनुवादित

साहित्यावर गंभीर समीक्षा शक्य आहे काय? आवश्यक आहे काय? यासाठी समीक्षकांनी आपला वेळ आणि शाई-कागद खर्च करावा काय?

मला तरी यावरचे उत्तर 'होय' असेच वाटते. आजवर अनुवादांकडे एक तर हेटाळणीने पाहिले गेले किंवा 'आंतरभारतीचे काम...' वगैरे म्हणून अनावश्यक अति-कौतुक केले गेले. त्याऐवजी या कलाकृतींकडे डोळसपणे पाहून, त्यांची गुणवत्ता जाणून घेण्यास वाचकांना मदत करणे- त्याचबरोबर प्रामाणिक समीक्षेतून अनुवादकांच्याही मर्यादा जाणून घेणे हे महत्त्वाचेच आहे. डॉ. देशपांडे यांनी हे लेख लिहिल्यामुळेच अनुवादकांच्या आणि अनुवादांच्या मर्यादांची माहिती होऊ शकली. ही प्रक्रिया जितक्या अधिक प्रमाणात होईल, तितका अनुवादकांनाही धाक निर्माण होईल आणि अनुवादाच्या गुणवत्तेवर परिणाम होईल. अनुवाद हा केवळ वेळ घालवण्याचा किंवा साहित्यक्षेत्रात उगाच लुडबूड करायचा प्रकार नसून, ते जबाबदारीने करायचे काम आहे, याचीही यातूनच अनुवादकांना जाणीव होईल.


**संदर्भ :**

डॉ. शिवराम कारंतांच्या मूळ कन्नड कादंबऱ्या

मराठी अनुवाद -

| | | |
|---|---|---|
| 'तनमनाच्या भोवऱ्यात' | - | अनुवाद सौ. उमा कुलकर्णी |
| 'मुकज्जी' | - | अनुवाद सौ. मीना वांगीकर |
| 'चोमा महार' | - | अनुवाद सौ. श्यामलता काकडे |
| 'डोंगराएवढा' | - | अनुवाद सौ. उमा कुलकर्णी |
| 'कुडिय' | - | अनुवाद सौ. उमा कुलकर्णी |
| 'अशी धरतीची माया' | - | अनुवाद श्री. रं. शा. लोकापूर |
| 'मिटल्यानंतर' | - | श्री. केशव महागावकर |

डॉ. सुधाकर देशपांडे यांचे लेख

| | | |
|---|---|---|
| 'मिटल्यानंतर' | - | **आलोचना** फेब्रु. ८४ |
| 'तनमनाच्या भोवऱ्यात' | - | **आलोचना** जाने. ८४ |
| 'अशी धरतीची माया' | - | **आलोचना** फेब्रु. ८४ |
| 'डोंगराएवढा' | - | **आलोचना** डिसे. ८५ |
| 'चोमा महार' | - | **आलोचना** ऑक्टो. ८६ |
| 'मुकज्जी' | - | **आलोचना** ऑक्टो. ८८ |

'कारंतांच्या परस्परविरुद्ध प्रकृतीच्या दोन कादंबऱ्या' - कै. प्रभाकर पाध्ये ('आभाळातील अभ्रे' या सदरात) रविवार सकाळ - २७ फेब्रुवारी, १९८३.



**शशिप्रभा, १०९८/११ बी, मॉडेल कॉलनी, पुणे ४११ ०१६**

# भाषांतरातील सर्जकता

## केशवसुतांच्या एका भाषान्तरित कवितेच्या निमित्ताने

दत्तात्रय पुंडे

केशवसुतांनी आधुनिक मराठी कविता घडवली. आपण नवी कविता घडवीत आहोत, याची जाणीव स्वतः केशवसुतांपाशी पक्केपणी होती, हे त्यांच्या काही काव्यविषयक कवितांतून सतत जाणवत राहते. अशी नवी कविता घडविताना कविता व कवी यांविषयी जनमानसात असणाऱ्या जुन्या संकुचित जाणिवा नाहीशा करण्याचेही काम केशवसुतांना करावे लागले; किंबहुना या वेगळ्याच कामात त्यांची बरीच काव्यशक्ती खर्ची पडली. तरीही केशवसुतांनी हे काम चिकाटीने व परिश्रमाने केलेले दिसेल. कविता व कवी यांविषयी नव्या जाणिवा रुजविताना त्यांनी प्रसंगी इंग्रजी काव्यविचाराचा किंवा काव्यानुवादांचाही आश्रय घेतलेला दिसतो. उदाहरणार्थ, अमेरिकन कवी एमर्सनच्या The Apology या कवितेचा अनुवाद केशवसुतांनी कवीविषयीची समाजातील समजूत स्वच्छ करून घेण्याच्या दृष्टीने केलेला दिसतो.

केशवसुतांनी The Apology चा केलेला अनुवाद एक अनुवाद म्हणून यशस्वी झालेला दिसतोच; पण त्यात अनुवादातही त्यांच्या प्रतिभेची चमक दिसून येते. कवितेद्वारे आपल्या जे सांगायचे आहे, ते जास्त परिणामकारक व्हावे, यासाठी कवी जो काही व्यूह रचत असतो, तसाच एक छोटा पण अन्वर्थक व्यूह केशवसुतांनी या अनुवादात रचलेला दिसेल. प्रस्तुत लेखाचा उद्देश केशवसुतांचा हा व्यूह समजावून घेणे हा आहे. यापुढे एमर्सनची मूळ कविता आणि केशवसुतांनी तिचा केलेला अनुवाद त्यादृष्टीने मुद्दाम देत आहे:

The Apology

Think me not unkind and rude
That I walk alone in grove and glen;
I go to the God of the wood
To fetch his word to men

Tax not my sloth that I
Fold my arms beside the brook;

Each cloud that floated in the sky
Writes a letter in my book

Clide me not, laborious band,
For the idle flowers I brought;
Every astor in my hand
Goes home loaded with a thought

There was never mystery
But 't is figured in the flowers;
Was never secret history
But birds tell it the bowers.

One harvest from thy field
Homeward brought the oxen strong
A second crop thy acres yield,
Which I gather in a song

-Ralph Waldo Emerson

सृष्टि आणि कवि

"Think me not unkind and rude
That I walk alone in grave and glen"

-Emerson

(वसंततिलका)
मी एकला फिरतसें बहुवार रानीं,
यालागुनी न समजा मजला अडाणी,
आराधुनी विपिनदैवत मी तिथूनी
त्याची प्रसादवचनें मनुजांस आणीं. १

पाहून निर्झर, उरीं कर वेंगुनीयां
मी ठाकतों, परि न मंद म्हणा जना या.
प्रत्येक मेघ वरता फिरतां नभांत
एकेक शब्द लिहितो मम पुस्तकांत! २

‘पुष्पें वनांत कसलीं खुडितो फिरोन?’
उद्योगमग्न जन हो! मज हें म्हणा न.
नक्षत्रसें सुम मदीय करांतले तें
सत्स्फूर्तिपूरित असें सदनास येतें! ३

पुष्पामधें प्रकट होय न जें जराही
सृष्टींत एकहि रहस्य असें न कांहीं;
ज्याचा ध्वनी न उमटे खगकूजितांत
नाहीं निगूढ इतिहास असा जगांत! ४

शेतामधूनि सदनाप्रत पीक एक
नेतात पुष्ट बलिवर्द तुझें सुरेख,
तूझी जमीन दुसरें मज पीक देते.
काव्यांत सांठवुनि ठेवितसें पहा तें! ५

**(करमणूक, २०-४-१८९५)**

या अनुवादाचा विचार करण्यापूर्वी एक-दोन निरीक्षणे मुद्दाम नोंदवावीशी वाटतात. पहिली गोष्ट म्हणजे, आपल्या अनुवादित कवितेवर स्वतः केशवसुतांनी एमर्सनच्या कवितेच्या पहिल्या दोन ओळी दिलेल्या आहेत. केशवसुतांनी अन्यत्र असे केलेले दिसत नाही. इमर्सन हा केशवसुतांचा आवडता कवी होता,[१] म्हणूनही त्यांनी असे केलेले असेल. परंतु याहूनही महत्त्वाची गोष्ट म्हणजे, ह्या अनुवादास केशवसुतांनी पूर्वी ‘कवीला भ्रमिष्ट समजू नका’ असे शीर्षक दिले होते. ते बदलून नंतर त्यांनीच ‘सृष्टि आणि कवि’ असे शीर्षक दिले. या बदललेल्या शीर्षकामुळे टीकाकारांची दिशाभूल झाली आणि समजण्यास सरळ, साधी, सोपी कविता असताही टीकाकारांनी तिचा अन्वयार्थ भलताच लावला. प्रा.रा.श्री. जोगांनी घेतलेला अर्थ उदाहरणादाखल पाहावा. प्रा. जोग या कवितेसंबंधाने म्हणतात, ‘या कवितेतही सृष्टी आणि तिजमधील सौंदर्य हा काव्याचा उत्तम विषय व स्फूर्ती ठरतात, हा आशय आहे.’[२] प्रा.भ.श्री. पंडितांचे या कवितेचे आकलन कवितेच्या प्रतिपाद्याच्या खूप जवळ जाणारे आहे. प्रा. पंडित या कवितेसंबंधाने लिहितात, ‘प्रस्तुत कवितेत जगातील अरसिकतेवर कटाक्ष आहे. काव्य हे जीवनाइतकेच महत्त्वाचे आहे. शरीराला अन्न, तसे मनाला काव्य हे पोषक आहे. शरीर व मन या दोहोंची वाढ सारखी झाली पाहिजे, हे तत्त्व या कवितेत आहे.’[३] प्रा.भ.श्री.

पंडितांसारखे काही थोडे टीकाकार जरी केशवसुतांना (मुळात इमर्सनला) अपेक्षित असणाऱ्या आशयाच्या निकट गेलेले असले, तरी त्यांना या कवितेचे मर्म पूर्णांशाने उमगले, की नाही, याची शंका वाटते. कारण बहुतेक टीकाकारांचे या कवितेपुरते लक्ष खिळून आहे ते–

पुष्पामधें प्रकट होय न जें जराही
सृष्टींत एकहि रहस्य असें न कांहीं;
ज्याचा ध्वनी न उमटे खगकूजितांत
नाहीं निगूढ इतिहास असा जगांत

याप्रमाणे येणाऱ्या चवथ्या कडव्यातील आशयावरच. कवितेचे 'सृष्टि आणि कवि' हे (बदललेले) शीर्षक आणि हे चवथे कडवे यांकडेच बहुतेक टीकाकारांनी जास्त लक्ष दिलेले दिसते. वास्तविक कवीची या कवितेतील–

(१) यालागुनी न समजा मजला अडाणी
(२) ....परि न मंद म्हणा जना या
(३) उद्योगमग्न जन हो! मज हें म्हणा न

यांप्रमाणे पुनःपुन्हा येणारी विनंती महत्त्वाची आहे. शेवटच्या कडव्यात याच स्वरूपाची अप्रत्यक्ष विनंती शेतकऱ्यास उद्देशून केलेली आहे, हेही लक्षात घेण्यासारखे आहे.

चवथे कडवे वगळता प्रत्येक कडव्यात कवीने केलेली विनंती आणि या अनुवादाला केशवसुतांनी प्रथम दिलेला 'कवीला भ्रमिष्ट समजू नका' हा मथळा लक्षात घेतल्यावर या कवितेचे प्रतिपाद्य सहज ध्यानात यावे. सारखा रानात एकटा फिरतो, छातीवर हात बांधून निर्झराकडे पाहत उभा राहतो किंवा वनात फुले तोडीत बसतो, म्हणून कवीला कोणी 'अडाणी' किंवा 'मंद' म्हणण्याचे कारण नाही. कारण तो 'विपिनदैवताची आराधना करून मनुजांसाठी प्रसादवचने आणे' इत्यादी प्रकारची कामे करीतच असतो.

उद्योगमग्न जगाच्या दृष्टीने कवी आपले आयुष्य उद्योगरहित असे घालवीत असतो. हा एक महत्त्वाचा समज कवीला दूर करावयाचा आहे; आणि इथेच तो मुद्दा येतो. कवीला प्राधान्याने हे सांगायचे आहे, की इतरांप्रमाणे कवीही समाजाचा उत्पादक घटकच आहे. यासाठीच कवीने दुसऱ्या कोणाचे नव्हे, तर शेतकऱ्याच्या उत्पादकतेचे उदाहरण स्वतःच्या

तुलनेसाठी घेतलेले आहे. कारण समाजपोषणासाठी शेतकऱ्याइतका दुसरा उपयुक्त घटक कोणताही नाही. ज्या भूमितून शेतकरी पीक घेतो आणि समाजाला जगवितो, त्याच भूमीतून कवी कवितेचे दुसरे पीक घेतो आणि संस्कतीचा परिपोष करतो, ही गोष्ट येथे अधोरेखित करावयाची आहे.

आपल्या अनुवादात केशवसुतांनीही इमर्सनचे प्रतिपाद्य जसेच्या तसे अधोरेखित केलेले आहेच. तथापि, अगोदर म्हटल्याप्रमाणे कवितेच्या चवथ्या कडव्यातील सहसंदेशामुळे आणि कवितेच्या बदललेल्या शीर्षकामुळेही टीकाकारांची दिशाभूल झालेली दिसते.

टीकाकारांची अशी दिशाभूल होण्याचे आणखी कारण म्हणजे केशवसुतांच्या या अनुवादातील सौंदर्य समजून घेण्याच्या बाबतीत ते थिटे पडले, हेही आहे. एखादी अनुवादित कृती मूळ कृतीशी जास्तीत जास्त प्रामाणिक असण्यात तिची यशस्विता असते हे खरे असते, पण तिच्या यशस्वितेचे आणखीही एक गमक असते, ते म्हणजे, ती अनुवादात स्वसंस्कृतीची बलस्थाने कशी नि किती क्षमतेने उपयोजू शकते. इमर्सनच्या The Apology चा अनुवाद मुळाबरहुकूम तर आहेच, पण त्याहीपेक्षा तो महाराष्ट्राच्या कृषिसंस्कृतीशी अधिक प्रामाणिक राहणारा आहे, म्हणून तो जास्त यशस्वी आहे.

कविता वाचत असताना एक प्रश्न पडतो, तो अडाणी या शब्दाच्या संदर्भात. कवी हा सुशिक्षित असताना, इतरेजन किंवा 'उद्योगमग्न जन' त्याला 'अडाणी' का आणि कसे म्हणू शकतात? केशवसुतांच्या या अनुवादित कवितेचे मर्म समजण्यासाठी या कवितेच्या पहिल्या कडव्याच्या दुसऱ्या ओळीतील 'अडाणी' हा शब्द समजून घेणे आवश्यक आहे.

'महाराष्ट्र शब्दकोशा'त 'अडाणी' या शब्दाचा अर्थ पुढीलप्रमाणे दिलेला आहे :[४]

**अडाणी** - १. अकुशल; अनिपुण; अनभ्यस्त; कलाहीन (माणूस); रानटी; ग्राम्य; जंगली; असभ्य; अशिष्ट; उद्धट; खेडवळ (भाषा, रीतभात); ओबडधोबड, वेडीवाकडी (वस्तू, पदार्थ).

२. अज्ञानी; न शिकलेला; विद्याहीन.
३. बिगर शेतकरी; अडाण.

केशवसुतांनी 'अडाणी' हा शब्द वरील क्र. १ आणि २ येथे दिलेल्या विविध अर्थांपैकी कोणत्याही एका अर्थाने वापरलेला नाही, हे स्पष्ट आहे. उलट, तो क्र. ३ येथे दिलेल्या अर्थाने वापरलेला आहे, हे कवितेचा शेवटच्या आशय लक्षात घेता स्पष्ट होते. 'महाराष्ट्र शब्दकोशा'तच क्र. ३ येथील 'अडाण' चा अर्थ पुढीलप्रमाणे दिलेला आहे.[५] :

**अडाण** :- शेती नसलेले किंवा न करणारे गावकरी; शेतकऱ्यांउलट; बलुतेदारांपेक्षा हे निराळे.

रा.वि. मराठे यांनी महाराष्ट्रातील गावगाडा या कृषिसंस्थेचा एक शब्दकोश तयार केला होता. तो अलीकडेच (त्यांच्या निधनानंतर) प्रकाशित झालेला आहे. त्यांनी 'अडाणी'चा अर्थ पुढीलप्रमाणे दिलेला आहे[६] :-

**अडाणी** :- बिगर शेतकरी; वाणी, ब्राह्मण, गुरव, सुतार, सोनार ह्या आपल्या (म्हणजे शेतकऱ्याच्या) आधारावर धंदा करणाऱ्याला शेतकरी अडाणी समजतात....लोकवस्तीचे विभाग जे 'कुणबी' आणि 'अडाणी', यांपैकी दुसरा विभाग हा 'अडाणी'. (म्हणजे) अडणारा.

आज हा शब्द 'बिगर शेतकरी' इ. अर्थाने खेड्यापाड्यांत वापरला जातो, की नाही, हे मला माहिती नाही. परंतु माझ्या लहानपणी म्हणजे चाळीसएक वर्षांपूर्वी 'अडाणी' हा शब्दप्रयोग ब्राह्मणास उद्देशून वापरला जायचा. लहाणपणी याचे मला सांगितले गेलेले कारण असे होते, की 'गावगाड्या'तील प्रत्येकजण जे काही करतो, ते प्रत्यक्ष दिसते. सुतार गाडीचे चाक तयार करतो, ते दिसते; लोहार त्यावर धाव बसवतो, ते दिसते; शेतकरी शेत पिकवून धान्योत्पादन करतो, ते दिसते; पण ब्राह्मण काय करतो, ते दिसत नाही. त्यामुळे 'अडाणी' हा शब्द 'अनुत्पादक', विशेषतः गावगाड्याच्या संदर्भात अनुत्पादक किंवा एकूण कृषिजीवनात अनुत्पादक अशा अर्थाने उपयोजिला जात होता, असे दिसते. प्रस्तुत कवितेत केशवसुतांनीही तो याच अर्थाने उपयोजिला आहे, हे स्पष्टच आहे. विशेषतः कवितेच्या शेवटच्या कडव्यातून हे जास्त स्पष्ट होते :

शेतामधूनि सदनाप्रत पीक एक
नेतात पुष्ट बलिवर्द तुझे सुरेख
तूझी जमीन दुसरें मज पीक देते
काव्यांत सांठवुनि ठेवितसें पहा तें!

'मला अडाणी म्हणजे अनुत्पादक म्हणू नकोस. ज्या जमिनीतून बैलांच्या वगैरे साहाय्याने तू **एक** पीक उत्पादितोस, त्याच जमिनीतून मी **दुसरे** पीक उत्पादन करतो आणि ते कवितेमध्ये साठवून ठेवतो. तेव्हा मीही तुझ्यासारखाच समाजाचा एक उत्पादनक्षम घटक आहे. मी 'अडाणी' नाही.' इ.

त्यामुळे पहिल्या कडव्याच्या दुसऱ्या ओळीत-

यालागुनी न समजा मजला अडाणी

याप्रमाणे येणारा अडाणी हा शब्द असाच, उगाच आलेला दिसत नाही. इमर्सनच्या कवितेतील unkind and rude चा आपण आज ज्या अर्थाने अडाणी हा शब्द वापरतो, तसा अनुवाद करण्याइतके काही केशवसुत निश्चितच अप्रबुद्ध नव्हते. केशवसुतांच्या काळापर्यंत गावगाडा संस्कृती टिकून होती. त्यामुळे केशवसुतांच्या अनुवादात तो शब्द सहज येऊन बसला आणि त्या शब्दाने शेवटच्या कडव्याशी सुरेख नाते जमवून घेतले.

इमर्सनच्या कवितेचा मुळाबरहुकूम अनुवाद करता करता केशवसुतांनी स्वसंस्कृती आणि स्वभाषा यांचे बळ मोठ्या सौंदर्यपूर्ण रीतीने वापरलेले येथे दिसेल. अनुवाद करतानाही कवीच्या प्रतिभेचे स्वतंत्र स्फुरण दिसत असते, हे येथे आपल्या लक्षात येईल.

**टिपा** : (१) हे मत प्रा.भ.श्री. पंडितांचे आहे. त्यांनी 'केशवसुत आणि इमर्सन' असा तुलनात्मक निबंधच लिहिलेला आहे. त्यात ते म्हणतात, 'केशवसुतांवर सर्वांत जास्त परिणाम जर कुणा कवीचा झाला असेल, तर तो इमर्सनचा होय. केशवसुतांनी आपले काव्यविषयक बहुतेक विचार इमर्सनचे उचलले असून, त्यांच्या सोळांहून अधिक कवितांवर इमर्सनच्या निबंधांतील विचारांची छाया पडली आहे. पाहा : भ.श्री. पंडित, केशवसुत : पाच चिन्तनिका, महाराष्ट्र प्रकाशन, अमरावती, १९६१, पृ. २७.

(२) प्रा.रा.श्री. जोग, 'टीपा', **हरपले श्रेय** (संपा.प्रा.रा.श्री. जोग), व्हीनस प्रकाशन, पुणे, १९५६, पृ. २१०.

(३) प्रा.भ.श्री. पंडित, 'टीपा', **समग्र केशवसुत** (संपा.प्रा.भ.श्री. पंडित), व्हीनस प्रकाशन, पुणे १९७८ (पुनर्मुद्रण), पृ. ३४०.

(४) यशवंत रामकृष्ण दाते आणि इतर (संपा.), **महाराष्ट्र शब्दकोश : विभाग पहिला**, प्रकाशक- महाराष्ट्र शब्दकोश मंडळ, पुणे, १९३२, पृ. ४० स्तंभ २.

(५) **तत्रैव**, स्तंभ १.

(६) रा.वि. मराठे, **'गांवगाडा'चा शब्दकोश**, प्रकाशक- सौ. मंजरी श्री. मराठे, मुंबई, १९९०, पृ. १०.

**मॉडर्न महाविद्यालय, पुणे ४११ ००५**

# कवितांचा अनुवाद : एक अनुभव

आसावरी काकडे

हिंदी भाषेची आणि कवितांची विशेष आवड असल्यामुळे अधूनमधून हिंदी कविता वाचण्याचा आणि खूप आवडलेल्या एखाद्या कवितेचा मराठीत अनुवाद करण्याचा स्वांतः सुखाय उद्योग मी करत असते. 'लम्हा लम्हा' या दीप्ति नवल यांच्या हिंदी कविता-संग्रहातील मला भावलेल्या आणि मनात रेंगाळत राहिलेल्या दोन-तीन कवितांचा मी असाच सहज म्हणून अनुवाद केला. हा अनुवाद करताना मला खूप मजा आली. मग वाटलं, की सर्वच कवितांचा अनुवाद करून पाहू या. सहज म्हणून हाती घेतलेलं काम किती अवघड आणि कौशल्याचं आहे, याचा हळूहळू अनुभव येऊ लागला.

'लम्हा लम्हा' या संग्रहातील कवितात जागोजाग बरेच उर्दू शब्द आहेत. त्यामुळे मला शब्दकोशाचा वापर करावा लागला. कवितेच्या बाबतीत तर हे शब्दकोशातले अर्थ तसे कुचकामीच असतात. पण कवितेच्या जवळ पोहोचायला त्यांचा उपयोग होतो. एकूण कवितेचा आशय आणि ओळीचा संदर्भ लक्षात घेऊनच एखाद्या शब्दासाठी शब्दकोशात दिलेल्या दोन-तीन अर्थच्छटांपैकी कोणती छटा आपण घ्यायची, ते ठरवावं लागतं.

उदा., 'माझ्या चारी बाजूंना काचेच्या भिंती आहेत. मला सर्वजण पाहू शकतात, मीही सर्वांना पाहू शकते, पण ऐकू शकत नाही, बोलू शकत नाही...कधीतरी मीच उभारलेल्या या काचेच्या भिंती मी मोडून तोडून टाकीन आणि निघून जाईन...जिथं मी काही सांगेन आणि खुलं आकाश ऐकत राहील!' अशा आशयाची एक कविता आहे. त्यातील अक ओळ अशी : 'अनगिनत मानूस चेहरे मुझे ताक रहे हैं' यातल्या 'मानूस' या शब्दाचे शब्दकोशात दोन-तीन अर्थ दिलेले आहेत- ज्याची भीती गेलेली आहे असा, माणसाळलेला, परिचित, प्रेम करणारा. कवितेचा एकूण आशय लक्षात घेता ओळीच्या संदर्भात 'मानूस' चा अर्थ 'अपरिचित' असा असेल, असं वाटलं होतं. शब्दकोशातले अर्थ पाहून मी बुचकळ्यातच पडले! यांतला कोणता अर्थ कवयित्रीला अभिप्रेत असेल, ते ठरवता येईना. कवयित्री सिनेकलावंत आहे, या संदर्भामुळे 'प्रेम करणारा' या अर्थीही 'मानूस' शब्द वापरला

असण्याची शक्यता आहे. पण आपण तसे गृहीत धरणे मला बरोबर वाटेना. शिवाय 'मानूस' या शब्दाच्या जागी दोन-तीन शब्द घालूनही चालण्यासारखे नव्हते. शेवटी वर सांगितलेल्या चार अर्थांपैकी 'परिचित' या त्यांतल्या त्यांत सर्व दृष्टींनी योग्य अशा शब्दाची निवड केली.

या उलट, एकच शब्द दोन-तीन कवितांत वेगवेगळ्या तऱ्हांनी आला, तेव्हा संदर्भानुसार त्या शब्दाजागी मराठीतल्या वेगवेगळ्या शब्दांची योजना करावी लागली. उदा., एका कवितेतली एक ओळ अशी :

'जाने क्यों मैलासा लगता है अपने आप...

अनुवाद : कोण जाणे, सारखं मलीन का वाटतं आहे माझं मलाच!

आणखी एके ठिकाणी म्हटलंय्...

मैलेसे डिब्बोंमें वक्त की धूल जमा करती है!

अनुवाद : निर्विकार डब्यांतून क्षणांची पुटं चढत राहतात!

इथे 'मैलेसे' चा शब्दशः अर्थ न घेता संदर्भातून सूचित होणारा अर्थ घेतला आहे.

तिसरं उदा. : 'मैलीसी, खामोशसी तंग सडकपर...

अनुवाद : सुनसान, अरुंद रस्त्यावर...

इथं 'मळलेल्या, शांत...असं लिहिलं असतं, तर मराठी भाषेच्या दृष्टीनं चुकीचं झालं असतं. कारण 'मळलेल्या वाटा' याला मराठीत विशिष्ट अर्थ आहे. तो अर्थ इथे अभिप्रेत नाही. म्हणून, माणसांची फारशी वर्दळ नसल्यामुळे शांत, साफसूफ न केलेले रस्ते असा अर्थ घेऊन मैली-सी, खामोश-सी या दोन शब्दांसाठी 'सुनसान' हा एकच शब्द घेतला.

कवितेची एक व्याख्या अशी आहे : 'Poetry is not the thing said but the way of saying it' 'लम्हा लम्हा' मधील कवितांचा अनुवाद करताना या व्याख्येनं मला फारच अडचणीत टाकलं! कवितेचं खरं सौंदर्य मनात उमटलेला आशय किंवा भाव सुचलेल्या कल्पनेद्वारा व्यक्त करण्यात आहे. पण काही वेळा मूळ भाषेतली कल्पना जशीच्या तशी शब्दशः मराठीत आणताना अगदीच कृत्रिम आणि नीरस होऊन जाते. मूळ कल्पनेतलं सौंदर्य, तरलपणा हरवून जातो.

उदा., एका कवितेची सुरुवात अशी आहे...

'आंचलसे लिपटे अजनबी हवाओं के लम्स

और दूर कहीं गिरजे में शामकी घंटियांसी...

ही पूर्ण कविता थोडी गंभीर आणि दीर्घ आहे. कवितेचा शेवट याच दोन ओळींनी केलेला आहे. यांतील पहिल्या ओळीचा अनुवाद करताना मूळ कल्पनेतलं सौंदर्य टिकवणं अशक्यच झालं. पुढील सर्व कवितेचा आशय लक्षात घेऊन मग या ओळीचा केवळ भावानुवाद करणं मला भाग पडलं. 'लम्हा लम्हा' मधील कवितांचा अनुवाद करताना ज्या काही तडजोडी कराव्या लागल्या, किंवा जिथे अशी कसरत करता करता मी दमून गेले, त्यांपैकी ही एक ओळ आहे. या ओळीचा मी केलेला अनुवाद असा...

'दूर एका चर्चमधे सायंकालीन घंटांचा नाद
अन् हृदयात एक अनामिक हुरहुर'

काही अगदी सोप्या वाटलेल्या कवितांनीही मला अनुवाद करताना खूप त्रास दिला. मूळ कवितेत जो काळ वापरला असेल, तसाच अनुवादात आणताना काही अडचण येईल, असं मुळीच वाटलं नव्हतं. पण याच संदर्भात एका कवितेनं मला अडचणीत टाकलं. या कवितेची सुरुवात अशी आहे :

मैंने देखा है जब दूर कहीं परबतों कें पेडोंपर...

आणि शेवट असा :

'तब, यूंही किसी चोटीपर देवदार के पेड के नीचे खडे खडे,
मैंने दिन को रात में बदलते हुए देखा है।'

ही मूळ कविता अतिशय चित्रमयी आहे आणि शेवट मनाला स्पर्श करणारा आहे. संध्याकाळपासून रात्रीपर्यंतच्या वेळातल्या एका सुंदर निसर्गदृश्याचं वर्णन या कवितेत आहे. प्रत्येक दोन ओळीनंतर आलेलं 'मैंने देखा है', हे हिंदी कवितेत वाचताना मुळीच वावगं वाटत नाही. पण 'मी पाहिलंय्' हे त्याचं मराठी रूप प्रत्येक दोन ओळींनंतर घातल्यावर मराठी कविता फारच कृत्रिम आणि असुंदर वाटू लागली. सगळीकडचं 'मी पाहिलंय्' काढून टाकल्यावरही शेवटची ओळ जोडल्यासारखी वाटू लागली. अनेक प्रकारे रचना करून पाहिल्या; पण समाधान होईना. शेवटी 'मी पाहिलंय् तेव्हा दूर कुठेतरी पर्वतराजीवरील वृक्षावर...' अशी सुरुवात करून मधे सगळे वर्णन जसेच्या तसे घातले आणि शेवटी- 'तेव्हा एखाद्या कड्यावर, देवदार वृक्षाखाली सहज उभी असताना पाहिलंय् मी, दिवसाची रात्र होताना' असा अनुवाद केला.

आणखी एका कवितेत वेगळीच अडचण आली. कवितेत सर्वनामांचा सर्रास वापर केला जातो. ही सर्वनामं अनेकार्थी असू शकतात आणि मूळ कवीला अभिप्रेत असलेल्या अर्थाहून वेगळा अर्थ, वेगळी परिमाणं वाचक कवितेला देऊ शकतो. पण अनुवाद करताना आपल्याला ही मुभा नसते. हिंदी भाषेत 'त्याला', 'तिला', तो-ती अशी वेगवेगळी सर्वनामं

नाहीत. त्यामुळे अनुवाद करताना मोठीच अडचण निर्माण होते. एका कवितेची सुरुवात आहे:
-'कई बार देखा है मैंने उसे अपने ख्वाबमें'...आणि पुढे कविता संपेपर्यंत कुठेही 'उसे' म्हणजे 'त्याला' की 'तिला' हे स्पष्ट झालेलं नाही. ही कविता मराठीत आणताना 'उसे' च्या जागी 'त्याला' किंवा 'तिला' यांपैकी एक काहीतरी घेणं मला भागच होतं. आणि नक्की कोण तेही अव्यक्त ठेवायचं होतं. मग पहिल्या ओळीचा अनुवाद असा केला :

'कितीतरी वेळा पाहिलंय् मी त्याला आपल्या स्वप्नात' या ओळीतील 'त्याला' हे सर्वनाम पुढच्या ओळीत आलेल्या 'अस्पष्ट चेहरा' (मूळ कवितेत 'धुंधला चेहरा') साठी आहे, हे वाचताना लक्षात येतं. कवितेच्या शेवटच्या ओळी आहेत :

कौन है वह शख्स? मालूम नहीं.
लेकिन इतना जानती हूँ
जिजे रोज करीबसे देखूंगी,
पहचान लूंगी!

अनुवाद : कोण असेल ते? माहीत नाही
पण एवढं खरं, की प्रत्यक्षात पाहिलं कधी,
तर सहज ओळखीन!

मराठी कवितेत दोन-तीन ठिकाणी 'त्याला' 'तो' ही सर्वनामं वापरूनही शेवटी 'कोण असेल ते?' असे घातल्यामुळे 'त्याला', 'तो' ही सर्वनामं 'चेहरा'साठी आहेत, हे लक्षात येतं. मूळ कवितेतला संदिग्धपणा असा विचारपूर्वक अनुवादित कवितेतही उतरवला आहे!

हिंदी भाषेत एक प्रकारचं मार्दव आहे. मराठी भाषा त्या मानाने जराशी राखठोक आहे. त्यामुळे काही शब्दांना तितकेच सुंदर पर्यायी शब्द मराठीत सहजी मिळत नाहीत. उदा., : खयाल, तसव्वुर, खामोशी, मंजिल, तनहाई, इ. त्यामुळे अनुवाद करताना मूळ कवितेतलं सौंदर्य अनुवादित कवितेत उतरताना फिकं पडत जातं. उदा., : मला खूप आवडलेल्या कवितेच्या या चार ओळी...

'थोडी देर तो चलने दो मुझे
इन खूबसुरत रहगुजरपर...
माना कि मंजिल उस तरफ नहीं है
मगर रुह को जब सुकून ना हो

तो मंजिलों का क्या करें कोई?'

खूप विचार करूनही 'मंजिल' साठी योग्य पर्यायी शब्द न मिळाल्यामुळे 'मंजिलोंका क्या करें कोई?' याचा अनुवाद मला समाधानकारक करताच आला नाही!

'लम्हा लम्हा' च्या अनुवादाच्या संदर्भात स्वतः कवयित्रीशी चर्चा करण्याचा योग आला तर काही ठिकाणी शब्दनिवडीबाबत मी घेतलेले निर्णय बदलता येतील. मला गवसलेला आशयही मूळ आशयातून दूर गेलेला नाही ना, हे ठरवता येईल.

दीप्ति नवल या स्वतः उत्तम चित्रकारही आहेत. त्यामुळे त्यांच्या बऱ्याचशा कविता चित्रमयी आहेत. कवितेतली वर्णनं अगदी तपशीलवार आहेत. माझा कल अशी वर्णनं करण्याकडे नसल्यामुळे दोन-तीन विशेषणांच्या जागी एखादेच विशेषण किंवा तपशील गाळून दोन ओळींची एक ओळ करण्याचा मोह मला बरेचदा झाला; पण अनुवाद प्रामाणिक व्हावा, म्हणून असे मोह मला टाळावे लागले.

सहज म्हणून मीच हौसेनं करायला घेतलेल्या या अनुवादाच्या कामानं मला खूप आनंद दिला. काहीतरी केल्याचं समाधान दिलं. आणि सर्वांत महत्त्वाची गोष्ट म्हणजे, या अनुवादाच्या अनुभवातून गेल्यावर अनुवाद ही काय चीज आहे, हे लक्षात आलं!

एखाद्या वाङ्‌मयीन कलाकृतीचा अनुवाद करणं हे खरंच फार कौशल्याचं काम आहे. ज्या भाषेतल्या कलाकृतीचा अनुवाद करायचा, ती भाषा; आणि ज्या भाषेत ती उतरवायची, ती भाषा, या दोन्ही भाषांवर चांगलं प्रभुत्व असल्याशिवाय अनुवादाचं काम चांगल्या तऱ्हेनं करताच येणार नाही. शिवाय ज्या वाङ्‌मयप्रकाराचा अनुवाद करायचा, त्या आकृतिबंधाचीही चांगली समज असणं आवश्यक आहे. त्या दृष्टीनं एखाद्या भाषेतील सुंदर कलाकृतीचा दुसऱ्या भाषेत अनुवाद करणं हे एक आव्हानच ठरतं!

कवितेच्या बाबतीत तर अनुवाद करणं जरा जास्तीच अडचणीचं आहे. कारण कवितेत एका शब्दासाठी पर्यायी एखादाच शब्द योजावा लागतो; आणि मूळ कवितेचा पूर्ण आशय समजून घेऊन, अभिव्यक्तीतलं सौंदर्य टिकवून समजलेल्या आशयाला पुन्हा कवितेचं रूप द्यायचं असतं! मूळ कवितेचा आशय आणि सौंदर्य टिकवण्याच्या प्रयत्नात तिचं अनुवादित रूपही तितकंच सुंदर आणि परिपूर्ण व्हायला हवं, याकडेही लक्ष द्यावं लागतं! मूळ कवितेतला आशय त्याच्या बाह्य सौंदर्यासह अनुवादित कवितेत आणायचा अट्टहास केला, तर अनुवादित कविता बेढब, नीरस होते आणि अनुवादित कवितेच्या अर्थाच्या मोहात पडलं, तर मूळ कवितेचा बाज दूर राहतो, असा दोन्हींकडचा तोल सांभाळत कवितेचा अनुवाद करणं म्हणजे अक्षरशः तारेवरची कसरतच आहे!

**'सेतु', स्टेट बँक नगर, कर्वेनगर, पुणे ४११ ०५२**

# वृत्तपत्रातील मराठी : एक अजब अनुवादप्रक्रिया

मुकुंद संगोराम

भाषिकज्ञान प्राप्त झालेल्या कुणाही नवसाक्षराची वृत्तपत्रे ही प्रयोगशाळा असतात. नवसाक्षराच्या दृष्टीने वृत्तपत्रे भाषाशिक्षणाचे माध्यम म्हणून काम करतात, तर भाषिक ज्ञान असलेला वाचक **माहिती** मिळविण्याचे एक प्रमुख साधन म्हणून वृत्तपत्राकडे पाहतो. भाषाव्यवहारातील वृत्तपत्र हे सर्वांत व्यापक व परिणामकारक माध्यम असले, तरीही भाषातज्ज्ञांनी वा प्रेमींनी या व्यवसायाकडे अशा दृष्टिकोनातून क्वचितच पाहिले आहे, असे दिसून येते.

भाषेत प्रसिद्ध होणाऱ्या कोणत्याही साहित्यकृतीच्या तुलनेने सर्वसामान्य वाचकांपर्यंत वृत्तपत्र अधिक पोहोचते. मराठी साहित्यव्यवहारात एक हजार प्रतींची आवृत्ती संपली, तरी खूप मिळविले, असे समाधान मानण्याची स्थिती दिसून येते. याउलट, मराठी वृत्तपत्रांचा रोजचा खप काही लाख प्रतींमध्ये आहे. 'घाईघाईतील साहित्य' अशी वृत्तपत्राची व्याख्या केली जात असली, तरी वृत्तपत्रातील मजकूर हा काही 'साहित्य' या प्रकारात मोडणारा नाही. असे असले, तरी भाषेची वृद्धी करणारे वृत्तपत्र हेच प्रभावी साधन व माध्यम ठरू शकते, हे लक्षात घेतले पाहिजे.

वृत्तपत्रांमधील भाषा हा स्वतंत्र संशोधनाचा विषय असला, तरीही त्याची परिणामकारकता लक्षात घेऊन, वृत्तपत्रातील संपादकीय कर्मचाऱ्यांनी भाषेच्या अंगाकडे अधिक गांभीर्याने व जाणीवपूर्वक पाहिले पाहिजे. वृत्तपत्रात काम करणाऱ्या सर्वांचीच भाषा एकसारखी असणे शक्य नाही. विविध प्रकारची भाषा शिकलेल्या व्यक्तींचा तो एक समूह असतो. प्रत्येकाच्या अभ्यासाचा, आवडीचा विषय वेगळा असल्याने भाषिक जाणिवा एकजिनसी असणे शक्य नाही, हे मान्य करायला हवे. मात्र तरीही वृत्तपत्रातून प्रसिद्ध होणारी भाषा वाचकावर, दीर्घकाळाने का होईना, परिणाम करणारी असते, याचे भान वृत्तपत्रीय कर्मचाऱ्यांमध्ये दिसून येत नाही. किमान शुद्ध मराठी लिहिता येणाऱ्या वृत्तपत्रीय लेखकांचा अभाव ही वृत्तपत्रांपुढील आजची बिकट समस्या आहे; आणि त्याचा संबंध भाषा–शिक्षणाशी जवळचा आहे.

रोज अतिसंख्य वाचकांच्या वाचनात येणाऱ्या वृत्तपत्रीय मराठी भाषेचे स्वरूप कसे आहे, तिच्यात सुधारणा होण्यासाठी काय करता येणे शक्य आहे, या दिशेने आजवर फारच स्वल्प प्रयत्न झालेले आहेत. या दिशेने लक्षात घेण्याची बाब ही, की ही भाषा भाषांतराच्या

माध्यमातून वाचकापर्यंत पोहोचते. त्यामुळे तिचा 'हा' पैलूही अभ्यासायला हवा.

वृत्तपत्रे ही संकल्पना भारतीय नाही. माहिती देण्याचे साधन म्हणूनच जगात वृत्तपत्रांनी प्रवेश केला. आजपर्यंतच्या वाटचालीत वृत्तपत्रांच्या हेतूचा मूळ गाभा बदललेला नाही. करमणूकपर, वैचारिक व ललित अशा लेखनाचा वृत्तपत्रातील अंतर्भाव फार अलिकडचा आहे. तरीही माहिती देण्याच्या मूळ उद्देशापासून वृत्तपत्रे ढळलेली नाहीतच. जी माहिती वृत्तपत्रे वाचकांना रोजच्या रोज देत असतात, तीतही कितीतरी वैविध्य असते. अमेरिकेतील घडामोडींपासून गल्लीतल्या चोरीपर्यंतची माहिती, रेल्वे-आरक्षणाची माहिती, लॉटरीचा निकाल, शेअर बाजार, भविष्य, पंचांग, आकाशवाणी-दूरदर्शनवरील कार्यक्रम, कुणाचे भाषण, कुणाचा गौप्यस्फोट अशा या माहितीच्याही नानाविध परी आहेत. त्यामुळे वृत्तपत्रातील संपादकीय विभागात काम करणाऱ्या कुणालाही या सगळ्यांचे भान असणे आवश्यक असते. या सर्व प्रकारच्या 'माहित्या' मिळविण्याचे मराठी वृत्तपत्रांचे प्रमुख साधन असते-ते म्हणजे **वृत्तसंस्था**. भारतीय पातळीवर काम करणाऱ्या भारतातील युनायटेड न्यूज ऑफ इंडिया व प्रेस ट्रस्ट ऑफ इंडिया या दोन प्रमुख वृत्तसंस्था आहेत. वृत्तपत्र कचेरीत बसविलेल्या दूरमुद्रक यंत्रावरून जगभरातील वेगवेगळी माहिती दिवसातले किमान १८ ते २० तास ओसंडत येत असते. या माहितीची विभागणी करून, तिच्या महत्त्वानुसार वृत्तपत्रात तिला स्थान देण्याचे काम प्रामुख्याने संपादकीय विभागाला करावे लागते. भारतात हिंदी भाषेतून माहिती देणारी वृत्तसंस्था कार्यरत असली तरीही, मराठी भाषेतील वृत्तसंस्था अद्यापही उदयाला आली नसल्याने इंग्रजीतून येणारी माहितीच मराठीत भाषांतरित करून देणे भाग पडते.

माहितीचा मूलस्रोत इंग्रजी असल्यामुळे भाषांतरीत मराठीवर तिचा मोठा प्रभाव पडणे क्रमप्राप्त ठरते. त्याहीपेक्षा वृत्तपत्रीय भाषेची जडणघडण आजवर इंग्रजीच्या आधारानेच झाल्यामुळे मराठी वृत्तपत्रातील भाषा इंग्रजीचा पगडा असलेली आहे, हे दिसून येईल. भाषिक वृत्तपत्रे निर्माण होण्याच्या कितीतरी अगोदर इंग्रजीतील वृत्तपत्रे स्थिरस्थावर झाली होती. भाषेच्या दृष्टीने त्या वृत्तपत्रांनी आपला वेगळेपणा निर्माण करण्यास प्रारंभही केला होता. त्यामुळे मराठी भाषेत वृत्तपत्रे निघू लागल्यापासून या व्यवसायावर इंग्रजीचा जो पगडा बसला आहे, तो आजवर तसाच टिकून आहे. हा प्रभाव कमी करण्याच्या दृष्टीने जाणीवपूर्वक प्रयत्न फारच थोडे झाले आहेत. ज्ञानाच्या कक्षा विस्तारत असताना, ते ज्ञान आपल्या भाषेतून पोहोचविण्याच्या प्रयत्नात भाषेचा जो अडथळा निर्माण होतो, तो दूर करीतच मराठी वृत्तपत्रांना वाटचाल करावी लागत आहे. (जाता जाता : वृत्तपत्रीय कचेरीत दैनंदिन कामांत वापरल्या जाणाऱ्या 'बॅनर' (मुख्य बातमी), 'अँकर' (पहिल्या पानावरील तळातील बातमी), 'हेडिंग' (शीर्षक) 'स्कायलाईन' (माथ्यावरील शार्षक) यांसारख्या असंख्य शब्दांना अद्याप

मराठी पारिभाषिक शब्द तयार होऊ शकलेले नाहीत!)

वृत्तपत्राचा गाभा माहितीचा-म्हणजे बातमीचा असतो. बातम्यांसाठी वृत्तपत्रातील एकूण मजकुरापैकी किमान ४० टक्के जागा वापरली जाते. या बातम्याही बहुसंख्येने भाषांतरित असतात. भाषांतरातील घोटाळयामुळे, किंवा विषयाच्या अज्ञानामुळे यथामूल माहिती पोहोचविण्यामध्ये अनेक अडचणी निर्माण होत असल्याचे कुणाही भाषातज्ज्ञाच्या लक्षात येऊ शकेल. मुंबईतील संगणकीय दूरध्वनी विनिमय केंद्रातील संगणकांमध्ये विषाणू शिरल्यामुळे निर्माण झालेल्या घोटाळयाचे वृत्त देताना 'कॉम्प्युटर बग्' या संगणकीय विषाणूसाठी वापरण्यात येणाऱ्या शब्दांचा अनुवाद अक्षरशः 'ढेकूण' असा केला गेला. दूरध्वनी केंद्रातील 'या' ढेकणांच्या सुळसुळाटाने वाचकाला नेमकी माहिती मिळू शकली नाही. यावरून असे लक्षात येईल, की वृत्तपत्रात केवळ भाषांतर (शब्दाला शब्द, वाक्याला वाक्य) होत नाही, की अनुवादही (त्या त्या भाषेनुरूप मोडणी देऊन मूळ मजकूर तयार करणे) होत नाही. या दोन्ही क्रियांचे मिश्रण असणारी क्रिया वृत्तपत्रात घडत असते. माहिती देत असताना तिचे महत्त्व व ज्ञान असणे ह्यामुळेच आवश्यक ठरते.

मराठी वृत्तपत्रातून योजिल्या जाणाऱ्या बातमीच्या भाषेवर व तिच्या मांडणीवर इंग्रजीचाच प्रभाव असल्याचे जाणवते. अगदी सहजपणे लक्षात येणारे उदाहरण द्यायचे, तर 'ते म्हणाले', 'ते पुढे म्हणाले', ही भाषा म्हणजे मूळ इंग्रजी सांगाड्याचे सहीसही भाषांतर आहे. माहिती देण्यासाठी वापरण्यात येणारा हा सांगाडा इंग्रजीवरून उचलण्यात आला आहे, हे जसे खरे, तसेच, त्यात बराच काळ बदल झालेला नाही, हेही खरे. वृत्तपत्राची भाषा ही मुख्यतः **'माहितीची भाषा'** असते. इतर कोणत्याही भाषा-प्रकारांहून ती अनेक अंगांनी भिन्न आहे. वृत्तपत्राच्या कचेरीत एखादी बातमी सांगण्यासाठी आलेल्या व्यक्तीचे नेहमीचे सांगणे असते, की 'तुम्ही ते तुमच्या भाषेत लिहून घ्या'. ही जी 'तुमची भाषा' असते, तीच ही माहितीची भाषा होय. उत्तम मराठी लिहिता येणाऱ्या कुणालाही या भाषेचा वापर कठीण वाटतो, यावरून या भाषेचा वेगळेपणाने अभ्यास करण्याची किती गरज आहे, हे लक्षात येऊ शकेल. माहितीची भाषा तटस्थ असते. कमींत कमी शब्दांत पण थेट माहिती देण्याचे कार्य ती प्रभावीपणे करीत असते. या भाषेचेही काही वेगळे 'व्याकरण' असते, त्यामुळे भाषासरणीच्या गुणधर्मांची साधक-बाधक, सखोल चर्चा मराठी भाषेच्या अभ्यासाचे कंकण बांधलेल्या संस्थांकडून व्हायला हवी, अशी अपेक्षा करणे गैर होणार नाही.

शब्द हा कच्चा माल वापरणारा वृत्तपत्र हा सर्वांत मोठा व्यवसाय आहे. विशिष्ट वेळात विशिष्ट मजकूर तयार करणारा तो एक **कारखानाच** असतो. असे असूनही शब्द, त्याचे सामर्थ्य व त्याचा वापर यांबाबत म्हणावी अशी जागृती असू नये. ही खेदकारक बाब नाही काय? भारतात इंग्रजी वृत्तपत्रांचा खप प्रादेशिक वृत्तपत्रांपेक्षा कितीही जास्त असला, तरीही प्रादेशिक

वृत्तपत्रांची परिणाम करण्याची शक्ती जास्त असते. प्रादेशिक वृत्तपत्रांनी या जबाबदारीचे भान ठेवणे आवश्यक आहे. प्रादेशिक वृत्तपत्रातील भाषांतरामुळे वेळोवेळी निर्माण होणारे दोष वा घोटाळे कमी करण्यासाठी मराठी भाषेतील तज्ज्ञांनी पुढे येणे गरजेचे आहे. मराठीत पारिभाषिक शब्दांची अडचण वृत्तपत्रांना नेहमीच जाणवत आली आहे. इंग्रजीतील 'प्रेसिडेंट' व 'चेअरमन'या दोन्ही शब्दांना मराठीत 'अध्यक्ष' असेच संबोधावे लागते. साध्या साध्या शब्दांचा अनुवाद करताना अर्थाची छटा आणि मजकुराचा आशय लक्षात घेऊन अनेकदा नवनवे शब्द निर्माण करणे गरजेचे असते. वृत्तपत्रातील उपसंपादकांना घाईच्या वेळात असा नवे शब्द निर्माण करणे शक्य नसते, त्यामुळे अनेकदा मुळातील इंग्रजी शब्द तसाच ठेवला जातो किंवा त्या शब्दाशी संबंधित वाक्यच गाळले जाते. भाषाप्रेमींनी असे नवे शब्द सुचविल्यास ते जनमनात रुळविण्यासाठी वृत्तपत्रे मोठा हातभार लावू शकतील. तांत्रिक शब्दांबाबत मराठी भाषा तोकडी आहे, हे नव्याने सांगायला नको. शास्त्र-विज्ञानाच्या क्षेत्रातील नवी माहिती मराठीतून समजावून देताना पारिभाषिक शब्दांची अडचण प्रकर्षाने जाणवते. मराठीच्या हट्टापायी अनेक वेळा बोजड किंवा सहजपणे अर्थ लक्षात येणार नाही, असे नवे शब्द तयार होतात व त्यामुळे संज्ञापनात अडथळे निर्माण होतात. भाषांतरामुळे मराठीची मूळ धाटणी बदलून ती अधिक क्लिष्ट होण्याचे प्रकारही वृत्तपत्रातून अनेकदा पाहायला मिळतात. वृत्तपत्राच्या कचेरीत भाषांतराचे काम किमान बारा ते चौदा तास चालू असते. या प्रक्रियेत वेगवेगळ्या मगदुराच्या, भाषिक संस्कृतीच्या व भाषाविषयक जाणिवा असलेल्या व्यक्तींचा सहभाग असतो. या सर्वांनी भाषांतरित केलेला मजकूर तपासून व त्या त्या वृत्तपत्राच्या भाषिक व्यक्तिमत्त्वानुसार तो जास्तीत जास्त निर्दोष करून जुळणीसाठी पाठविण्याची यंत्रणा फारच थोड्या वृत्तपत्रांत असते. या यंत्रणा तयार करण्यासाठी वृत्तपत्रांनी प्रथमतः भाषिक शिस्तीचे भान ठेवायला हवे. त्यासाठी असे भान असणाऱ्या व्यक्तींची गरज असते, ही गरज व्यवस्थापनानेही लक्षात घ्यायला हवी.

वृत्तपत्रांना माहिती पुरविणाऱ्या वृत्तसंस्था किंवा काही इंग्रजी वृत्तपत्रे यांच्यामधे वर उल्लेखिलेली भाषिक शिस्त बऱ्याच प्रमाणात पाळली जाते. भाषाशैलीबाबतचा तेथील आग्रह कौतुकास्पद म्हटला पाहिजे. मराठी वृत्तपत्रांमध्ये काम करणाऱ्या सर्वांनी ही शिस्त पाळायची ठरविली, तर मराठीचेही काही भले होऊ शकेल! भाषांतर ही एक कला आहे, हे जाणून घेऊन ती अवगत करून घेण्यासाठी वृत्तपत्रातील संपादकीय नेतृत्वाने जागृत राहायचे ठरविण्यास हे फारसे अवघड नाही. मराठी वृत्तपत्रांकडे वृत्तसंस्थांकडून येणाऱ्या सर्वच बातम्या जशाच्या तशा वापरल्या जाणे जागेच्या मर्यादेनुसार व वाचकांच्या आवडीनुसार शक्य नसते. त्यामुळे इंग्रजी बातमीचे भाषांतर करताना, बातमीचा विषय, आशय, आपल्या परिसराच्या दृष्टीने महत्त्व, वाचकाची गरज, त्यामागील संदर्भ अशा अनेक बाबींचा विचार

करणे भाग असते. वर म्हटल्याप्रमाणे शब्दशः भाषांतर किंवा अनुवाद याहून ही प्रक्रिया काहीशी वेगळी का आहे, हे यावरून समजू शकेल. या प्रक्रियेतील गुंतागुंत सोडविणे हे वृत्तपत्राशी संबंधित असलेल्यांचे व भाषाप्रेमींचे कर्तव्य आहे.

एका वृत्तपत्रातील हे शीर्षक पाहा :

सव्वा लाखाची बेकायदा चांदी पोलिसांकडून जप्त

(बेकायदा चांदी अन्य कुणी पोलिसांकडून जप्त केली, असाही याचा अर्थ होऊ शकतो.)

किंवा पुढील बातमीतील भाषा पाहा :

'नववर्षदिनी झेकोस्लोव्हाकियातील झेक व स्लोव्हाक वंशीयांनी आज घंटानाद करून दोन स्वतंत्र राष्ट्रे निर्माण झाल्याची नांदी केली.'

(राष्ट्रांची स्वतंत्रतेची नांदी म्हणजे काय? हे शोधण्याच्या प्रयत्नात वाचक शीण करून घेत नाहीत!)

मराठीचा असा चुकीचा किंवा सढळ वापर अनेक वेळा दिसू शकेल. परंतु अनुवाद/भाषांतर प्रक्रियेचीच सवय झाल्यामुळे मराठी वाक्यरचनेचेही कसे तीनतेरा वाजतात. हे पुढील उदाहरणावरून लक्षात येईल.

'प्रतिभेच्या उभारीला कष्टाची जोड दिली, की 'वेगळी' कलाकृती निर्माण होते...' केवळ प्रथितयश साहित्यिकासारखं विश्वास पाटील बोलत नव्हते; तर 'वेगळी' ठरावी, अशी 'झाडाझडती' सारखी कादंबरी लिहिल्यानंतरच ते बोलत होते.'

भाषावृद्धी आणि संवर्धनाच्या कार्यात वृत्तपत्रांनी गंभीरपणे सहभागी होण्यासाठी भाषेवर प्रेम असणाऱ्या सर्वांनीच वृत्तपत्रांवर 'प्रेमाचा दबाव' आणायला हवा. त्यासाठी सोपे, सुटसुटीत व अर्थवाही पारिभाषिक शब्द तयार करून ते वृत्तपत्रांकडे पाठवायला हवेत. नवनव्या विद्याशाखांमधील तज्ज्ञांनी मातृभाषेत ज्ञान आणण्यासाठी तळमळीने कार्य करायला हवे. मराठीच्या दुर्दशेबद्दल लेख लिहून किंवा परिसंवाद/चर्चा करून ती थांबणे शक्य नाही, त्यासाठी वृत्तपत्रासारख्या प्रभावी संज्ञापन माध्यमांचा उपयोग अधिक हितकारक ठरणारा आहे. अन्यथा वृत्तपत्रातील ही 'अनुवादित मराठी' मूळ मराठीवर परिणाम (खरे तर आक्रमण सुद्धा) केल्याशिवाय राहणार नाही.

**'रामनाथ', ५१, गणेश मळा, विठ्ठलवाडी रस्ता, पुणे ४११ ०३०**

# अनुवाद - एक व्यवसाय

वि. गं. नेउरगावकर

भाषांतराचा जन्म बहुधा भाषेच्या जन्मापासूनच झाला, असे म्हटल्यास फार अतिशयोक्ती होईल, असे वाटत नाही. परंतु अनुवाद करणे हा व्यवसाय बनण्यास मात्र अनेक शतके लागली, ही तितकीच खरी गोष्ट आहे. सुरुवातीला दैनंदिन जीवनातील व्यवहार समजून घेण्यापुरतेच भाषांतर करणे सीमित राहिले असेल. परंतु मानवाच्या सर्वांगीण उन्नतीबरोबरच भाषाभिवृद्धी होत गेली. निरनिराळे धर्म व धर्मग्रंथ उदयाला आले व त्याचबरोबर तत्त्वज्ञान, अध्यात्म, साहित्य, इत्यादी विषयांमध्ये प्रगती झाली व ज्ञानलालसेपोटी अनुवाद करणे जरुरीचे झाले. आचारविचार, साहित्यातील सौंदर्य ह्यांसारख्या गोष्टी जाणून घेण्याची उत्सुकता वाढली. भाषांतराचा दर्जा सुद्धा खूप उंच होता, हेही विधान वावगे मानता येणार नाही. उदाहरणार्थ, प्रसिद्ध जर्मन कवी गटे ह्याने ज्या वेळी शाकुंतलाचे संस्कृत-इंग्रजी-जर्मन भाषांतर वाचले, त्या वेळी तो अक्षरशः नाचला, असा प्रवाद आहे. भाषांतराची पातळी जरी खूपच वरची असली, तरी भाषांतराकडे जास्त करून कला म्हणून पाहिले जाई. त्याला व्यावसायिक स्वरूप आले नव्हते.

युरोपमध्ये औद्योगिक क्रांती घडून आली, तेव्हापासून विज्ञान व तंत्रज्ञान ह्या दोन विषयांची झपाट्याने प्रगती झाली व आज आपण विसाव्या शतकात विज्ञानाचा विस्फोट झाल्याचे अनुभवत आहोत. ह्या सर्व बदलांमुळे निरनिराळे लोक व त्यांची संस्कृती व देश खूपच जवळ आले व त्यामुळे एकमेकांवरचे अवलंबन वाढले. देशादेशांमधील व्यापार-संबंध वाढले व त्याचबरोबर तंत्रज्ञानाची देवाणघेवाण वाढली. अशा अनेक कारणांमुळे भाषांतर करण्याची जरूर खूपच भासू लागली व भाषांतर करण्याला सुद्धा व्यावसायिक स्वरूप येऊ लागले. व्यावसायिक अनुवादाच्या शाखांमध्ये बरीच भर पडली व रोजच्या रोज पडत आहे. उदाहरणार्थ, विज्ञानाच्या व तंत्रज्ञानाच्या सर्व शाखा, व्यापारात प्रचलित असणारी भाषा, जाहिरात, राजनीती, त्याचबरोबर प्रशासन व अर्थात लोकप्रिय वाङ्मय.

भारतात अजून सुद्धा अनुवाद व्यवसाय बाल्यावस्थेत आहे व मुख्यत्वेकरून शास्त्रीय व तांत्रिक विषयांमध्येच अनुवादाला मागणी जास्त आहे. अलीकडेच पत्रव्यवहाराच्या व व्यापारातील भाषांतराची जरुरी भासू लागली आहे. अनुवादाचा एकूणच दर्जा कमी होता

व अनुवाद व्यवसायाला सुद्धा प्रतिष्ठा कमी होती. काही वर्षांपूर्वी अनुवादाला टंकलेखनापेक्षा थोडासाच जास्त दर्जा दिला जात होता. एकदा एका कंपनीकडे एका विज्ञान विषयातील जर्मन भाषेतील पुस्तकाचे अनुवादाचे काम आले व त्याकरता त्यांना भाषांतरकार हवे होते. परंतु त्या कामाकरता मोबदला फारच कमी देत होते. त्यांचे म्हणणेः तुम्हांला शब्द तर सर्वच माहिती आहेत व तेच ते शब्द वारंवार येतात, तर परत त्याला पैसे कसे मागता? हल्ली परिस्थितीत खूपच फरक पडला आहे.

भाषांतर करताना मूळ मजकुराशी इमान राखलेच पाहिजे; परंतु ह्याचबरोबर भाषांतरात बोजडपणा येता कामा नये. शास्त्रीय किंवा तांत्रिक भाषांतरकाराला नुसत्याच दोन्ही भाषा चांगल्या अवगत असून उपयोग नसतो. त्याला त्याचबरोबर त्या विषयाचे थोडे तरी ज्ञान असावे लागते. एकाच व्यक्तीला सर्व विषयांची समज असणे अशक्य आहे. त्यावर उपाय म्हणून अनुवादकाने त्या विषयावरील इंग्रजीतील इतर लेखन वाचले पाहिजे. दुसरा उपाय म्हणजे, सुरुवातीच्या काही भागांचे भाषांतर झाल्यावर त्या विषयातील जाणकार व्यक्तीबरोबर चर्चा करावी, म्हणजे चुका सुधारता येतात. एकदा एक प्राणिशास्त्रात डॉक्टरेट करणारा विद्यार्थी माझ्याकडे एक लेख घेऊन आला. माझ्याकडे येण्यापूर्वी तो अनेकांकडे जाऊन आला, परंतु ह्या लेखात एकूणच खूप संक्षेप वापरले असल्यामुळे ते भाषांतर अवघड झाले होते व त्याचबरोबर तो एक संदर्भ लेख असल्यामुळे निरनिराळी एकमेकांविरुद्ध अशी मते मांडली होती. मलाही त्या विषयाचे ज्ञान यत्किंचितही नव्हते. पण मी सुरुवातीला दोन-तीन पाने भाषांतर करून दिली व त्यातील चुका दुरुस्त करावयास त्या विद्यार्थ्याला सांगितले. तर त्याने सांगितले, की मी माणसाच्या शरीराचे वर्णन करताना वापरात असलेले शब्द वापरले होते व ते कीटक किंवा तत्सम प्राण्यांबाबतीत ते शब्द वापरत नाहीत. तेवढे सात-आठ शब्द सुधारल्यानंतर भाषांतर करणे सोपे झाले.

भाषांतरकारावर एक मोठी जबाबदारी असते, ती म्हणजे गोपनीयतेची. कारण आजकाल जे विदेशांमधून तंत्रज्ञान येते, त्याकरता बरीच मोठी किंमत मोजावी लागते. व अशी माहिती जर भाषांतरकाराकरवी दुसऱ्याच्या हातांत पडली, तर मोठे नुकसान घडण्याची शक्यता असते. एकदा एका कंपनीने माझ्याकडे जवळपास ४० पाने भाषांतर करण्यास पाठविली. त्यांना साहजिकच ते काम लवकर करून पाहिजे होते. मी त्यांना सुचविले, की मी काही भाग माझ्या मित्राकडून करवून घेतो. म्हणजे त्यावर मला वेळ सांभाळता येईल. त्यावर मला सांगण्यात आले, की आमचा तुमच्यावर विश्वास आहे, तसा तुमच्या मित्रावर असणे शक्य नाही, कारण आम्हांला त्याचा अनुभव नाही. तेव्हा तुम्ही चार दिवस जास्त लावले तरी चालेल,

पण काम मात्र तुम्ही एकट्यानेच करा.

त्याचप्रमाणे ज्या वेळी पत्रव्यवहारात कायद्याची व वादाची कलमे असतात, त्या वेळी भाषांतरकारावर मोठीच जबाबदारी येऊन पडते. कारण त्यात कोणतीच चूक असता कामा नये. एकदा एका कंपनीचा टेलेक्स संदेश आला होता. त्या कंपनीत जर्मन जाणणारे बरेच तंत्रज्ञ होते. त्यांनी बराच वेळ काथ्याकूट केला; पण प्रश्न सुटेना. तेव्हा त्यांच्या संचालकांनी सांगितले, की अमुक अमुक माणसाकडे तुम्ही जा व तो जे म्हणेल, त्याप्रमाणे आपण पुढचे पाऊल टाकू या. मी तो टेलेक्स संदेश वाचला व त्यांच्याकडे त्यातल्या दोन व्याकरणाच्या चुका दुरुस्त करून घेण्याची परवानगी मागितली. कारण त्याशिवाय त्याचे भाषांतर बरोबर होणे शक्य नव्हते. त्यांनी तशी परवानगी दिल्यावर मी त्या मजकुराचे भाषांतर केले व ते गृहस्थ लागलीच म्हणाले, 'हेच आम्हांला पाहिजे होते. आम्ही दोन तास फुकटच वाया घालविले.' येथे एक मुद्दा उपस्थित होतो, तो म्हणजे अनुवादकाला त्या भाषेच्या व्याकरणाची अचूक माहिती असली पाहिजे.

भाषांतर करताना अजून एक अडचण येते, ती अशी, की एखादा जर्मन शास्त्रज्ञ त्याच्या मातृभाषेत जरी लेख लिहीत असला, तरी तो बऱ्याच वेळा बोलीभाषेतील शब्द वापरण्याची शक्यता असते किंबहुना त्याचे जर्मन भाषेतील लेखन सुद्धा फारसे सुबोध नसते. उदाहरणार्थ, एका जर्मन लेखात एक विशिष्ट शब्द बऱ्याच वेळा आला होता. व त्याचा अर्थ कोणत्याही शब्दकोशात सापडेना. बऱ्याच जर्मन लोकांना सुद्धा मी त्याचा अर्थ विचारला. त्यांना सुद्धा तो सांगता येईना. शेवटी चुकून एका ऑस्ट्रियन गटाबरोबर मी पुण्यात फिरत असताना त्यांना मी तो सहजगत्या विचारला, तर त्यांनी ताबडतोब तो शब्द समजावून सांगितला व मला हेही सांगितले, की हा शब्द फक्त आल्प्सच्या आसमंतातच जास्त प्रमाणात वापरला जातो.

अनुवादाचा दर पानाला (टंकलेखनाचा खर्च धरून) अमुक इतके रुपये (एक पान म्हणजे ३०० शब्द) असे सांगण्याची पद्धत आहे. हा दर जसा अनुवादकाच्या योग्यतेवर अवलंबून असतो (त्याचे कौशल्य, पूर्वानुभव, शैक्षणिक पात्रता, इत्यादी), तसा तो अनुवाद करायच्या मजकुराच्या स्वरूपावर आणि कोणत्या भाषेतून कोणत्या भाषेत अनुवाद करायचा आहे, यावर अवलंबून असतो. मध्यस्थ असल्यास त्याला किती द्यायचे, हेही ठरवावे लागते. उदाहरणार्थ, वैज्ञानिक-तांत्रिक-व्यापारी अनुवादाला औद्योगिक किंवा व्यापारी ग्राहकाकडून बराच जास्त दर मिळतो, तेवढा साहित्यिक अनुवादाला किंवा पाठ्यपुस्तकाच्या अनुवादाला नियतकालिकाकडून किंवा ग्रंथप्रकाशकाकडून मिळणार नाही. थोडक्यात, मागणी आणि





अनुक्रमणिका

पुरवठा या तत्त्वांवर दर कमी-जास्त ठरतो. नवख्या अनुवादकाला साहजिक मध्यस्थ संस्था किंवा खाजगी एजन्सी यांच्यावर अधिक अवलंबून राहावे लागते.

खाजगी एजन्सी सार्वजनिक मध्यस्थ संस्थेपेक्षा मोबदला सामान्यतः जास्त देते. उदाहरणार्थ, जर्मन, फ्रेंच ह्या भाषांतून इंग्रजीत करायच्या अनुवादाचा दर रशियन, जपानी किंवा तत्सम दुर्मीळ भाषांच्या मानाने कमी असतो. तरी सुद्धा खाजगी संस्था ग्राहकांकडून ३०० शब्दांच्या पानाला जर्मनमधून इंग्रजी भाषेच्या अनुवादाला साधारणपणे १००/- रु. आकारतात. जपानी भाषेला सर्वांत जास्त मोबदला मिळतो.

सर्वसाधारणपणे इतर परकीय भाषांमधून इंग्रजी भाषेत अनुवाद करणे भारतीयांना तितकेसे जड जात नाही कारण इंग्रजीवर आपले बऱ्यापैकी प्रभुत्व असते. परंतु प्रश्न येतो, तो इंग्रजीतून जर्मन, फ्रेंच किंवा इतर भाषांमध्ये करताना, सामान्य भारतीयाला ती परकीय भाषा तितकी अवगत नसते. अशा प्रकारच्या कामाचे प्रमाण कमी असले, तरी मोबदला खूपच चांगला मिळू शकतो. काही वर्षांपूर्वी एका जर्मन भाषेतील सेमिनारच्या निमित्ताने दिल्लीला जाणे झाले. त्याच वेळी दिल्लीत एक आंतरराष्ट्रीय औद्योगिक प्रदर्शन भरणार होते. त्याकरता बऱ्याच भारतीय कंपन्यांना व सरकारी खात्यांना निरनिराळ्या माहितीपत्रकांचे, भाषणांचे व जाहिरातींचे जर्मनमध्ये भाषांतर करून हवे होते व ते सुद्धा कमी वेळात. परंतु सर्व दिल्लीमध्ये प्रयत्न करूनसुद्धा अशी माणसे मिळेनात. तेव्हा ते काम मी व आमचा एक मित्र ह्यांच्याकडे आले व आम्हांला ते रात्री जाणून करावे लागले.

एकूण पाहता अनुवादाला आज मागणी खूप आहे व त्याला प्रतिष्ठाही लाभली आहे. खाजगीरीत्या केलेल्या कामाचा मोबदला सुद्धा बऱ्यापैकी मिळू लागला आहे. दोन्ही भाषांमध्ये उलटसुलट भाषांतर करता आले, तर फारच चांगले. जर्मन-इंग्रजी, इंग्रजी-जर्मन अशा दोन वेगळ्या जोड्या अनुवादाच्या दृष्टीने मानल्या जातात. हे एक उदाहरण झाले. त्याचबरोबर इतरही काही भाषांचे जुजबी जरी ज्ञान अवगत केले, तर अनुवाद व्यवसाय म्हणून निवडला, तर त्याची खूपच मदत होते. तेव्हा मराठी भाषकांनी ह्या अनुवादाच्या क्षेत्रात लक्ष घातले, तर स्वागतार्हच, असे म्हणता येईल. जाता जाता एकच महत्त्वाचे व्यावसायिक गुपित सांगावेसे वाटते, ते म्हणजे, भाषांतराचा दर्जा कितीही चांगला ठेवला, तरी भाषांतरकाराने व्यवसायात पडावयाचे असल्यास वेळेलाही तितकेच महत्त्व दिले पाहिजे.

**१३ पाटील टेरेसिन, ८८४ बी, भांडारकर रस्ता गल्ली, पुणे ४११ ००४**

# मौखिक अनुवाद :
# एक व्यवसाय व व्यवहार

य.चिं. देवधर

**प्रास्ताविक**[1]

चालू संपर्क-युगात भिन्नभाषिक व्यक्ती व समूह परस्परांशी उत्तरोत्तर वाढणारा व गतिमान होणारा भाषाव्यवहार करीत आहेत. कारण ज्ञान, तंत्र, विचार आणि समाचार यांची त्वरित देवाण-घेवाण हे प्रगतिशील मानवी जीवनाचे आवश्यक अंगच बनलेले आहे. प्रथम त्वरित संपर्क आणि नंतर उभयपक्षी मजकुराची देवाण-घेवाण या क्रमाने हा व्यवहार चालतो. हा व्यवहार एकाच समान भाषेत असेल, तर भाषेची अशी अडचण येत नाही. पण जेव्हा देणाऱ्या

---

१. या लेखापुरते खालील शब्दसंज्ञांचे अर्थ पुढीलप्रमाणे समजावेत :

भाषा जोडी : 'अ' भाषा व 'ब' भाषा.

उभय पक्ष : 'अ' पक्ष व 'ब' पक्ष

यजमान पक्ष : अनुवाद-सेवा आयोजित करणारा पक्ष.

उगम भाषा : ज्या भाषेचा अनुवाद करायचा, ती भाषा

लक्ष्य भाषा : ज्या भाषेत अनुवाद करायचा ती भाषा.

अनुवाद उलट सुलट होत असताना 'अ' भाषा व 'ब' भाषा आळीपाळीने उगम भाषा व लक्ष्य भाषा असतात.

प्रतिपादन : उगम भाषेत बोलण्याची क्रिया.

हेतुविषय : 'अ' व 'ब' मधील चर्चा/देवाणघेवाणीचा विषय.

प्रतिपाद्य : प्रतिपादित विधानाचा 'गाभा' (Message).

मौखिक अनुवाद : उगम भाषेतील प्रतिपाद्याचे लक्ष्य भाषेत केलेले मौखिक रूपांतर (Interpretation).

मौखिक अनुवादक :अनुवाद करणारा व्यावसायिक (Interpreter). अनुवादकास 'दुभाषा' असेही म्हणतात.

लिखित अनुवाद, भाषांतर : उगम भाषेतील मजकुराचे लक्ष्य भाषेत केलेले लिखित स्वरूप (Translation)

भाषांतरकार : भाषांतर सिद्ध करणारी व्यक्ती.

पक्षाची भाषा घेणाऱ्या पक्षाच्या भाषेहून भिन्न असते, तेव्हा उभयपक्षी भाषेची अशी एक वेगळी अडचण जाणवते. संपर्क झाला, पण पत्रव्यवहार अडला, असे होते. ही अडचण दूर करण्याचा उपाय, म्हणजे मौखिक अनुवाद. यालाच 'दुभाषेपण' असेही म्हणता येईल.

आपले 'अ' भाषेतील प्रतिपाद्य (म्हणजे) किंवा मजकूर 'अ' पक्षाने 'ब' पक्षाला त्याच्या 'ब' भाषेत समजावून दिले, की अर्धा व्यवहार साध्य होतो. या उलट, 'ब' पक्षाने 'ब' भाषेतले त्याचे प्रतिपाद्य 'अ' पक्षाला त्याच्या 'अ' भाषेत समजावून दिले, की व्यवहार पूर्ण होतो. एका भाषेतून दुसऱ्या भाषेत समजावून देण्याचे कार्य करणारा तिसरा पक्ष म्हणजे मौखिक अनुवादक. मौखिक अनुवादकाला (किंवा दुभाष्याला) दोन्ही भाषा अवगत असल्याने तो 'अ' पक्षाशी 'अ' भाषेत आणि 'ब' पक्षाशी 'ब' भाषेत बोलू शकतो. या कामाला मौखिक अनुवाद म्हणतात. अनुवादकाच्या साहाय्याने भिन्नभाषिक पक्षांना व्यवहार करणे हितकारक ठरते.

हे साहाय्य देण्याच्या दोन पद्धती आहेत, मौखिक अनुवाद आणि लिखित अनुवाद. (लिखित अनुवादासाठी 'भाषान्तर' हा शब्द अधिक योग्य वाटतो.) प्रस्तुत लेखात मौखिक अनुवादाचाच विचार करायचा आहे. या दोन पद्धती किंवा सेवा व्यावसायिक दृष्ट्या वेगवेगळ्या आहेत. त्यांचे वेगळेपण एक मौखिक, तर दुसरी लिखित, येथेच संपत नाही. त्या सेवांचे उपयोग व मोजमाप वेगवेगळ्या प्रकारे करतात. एकच व्यक्ती मौखिक अनुवादक व भाषांतरकार असू शकते. अनुवादाचे काम तात्कालिक महत्त्वाचे व जलद गतीचे असते व त्याचा मेहनताना कामाच्या तासांवर व दिवसांवर ठरवतात. मौखिक अनुवाद सेवा अल्प काळात जास्त लाभकारक असते. त्या मानाने भाषांतर सेवा तेवढ्याच वेळात कमी लाभकारक असते. तुलनेने भाषांतर करण्यास जास्त वेळ लागतो. त्याचा मेहनताना मजकुराच्या शब्दसंख्येवर अथवा पृष्ठसंख्येवर ठरवतात. अधिक अर्थलाभाच्या उद्देशाने मौखिक अनुवाद आणि भाषांतर करणारे व्यावसायिक आढळतात. दोन्ही कामांतील कौशल्य कष्टसाध्य असले, तरी आवश्यक असलेल्या वैयक्तिक क्षमता वेगवेगळ्या आहेत. (उदा., स्मरणशक्ती, ग्रहणशक्ती, समरसता, सहज बोलणे). हे खरे, की मौखिक अनुवाद सेवेत एक खास जिवंतपणा, रोमांचकता, आणि डौल असल्याने त्याचे आकर्षण जास्त, काही काळ मिरविता येणे, 'नाव' होणे, प्रतिष्ठा लाभणे, बड्या मंडळींत वावर होणे; इत्यादींनी 'स्वत्व' सुखावते; पण असे श्रेय क्षणभंगुरच, अळवावरचं पाणी! उत्तम भाषांतरकृतीचा चिरकाल टिकणारा कीर्तिपरिमल म्हणजे कुठे इंद्राचा ऐरावत! अनुवाद उच्चारताक्षणीच काम करून हवेत विरून जातो. तेरड्याचा रंग निदान तीन दिवस टिकतो तरी!

मग इतक्या क्षणभंगुर कर्तृत्वात दडलंय् तरी काय? तेच आपण पाहणार आहोत.

## १. मौखिक अनुवाद :

**व्याख्या**

'अ' भाषेतील प्रतिपाद्याचे 'ब' भाषेत **तात्काळ, सलग, व यथार्थ** असे मौखिक रूपांतर म्हणजे मौखिक अनुवाद. **तात्काळ** दोन अर्थांनी रूढ आहे. एक म्हणजे, 'अ' पक्षाचे भागशः अथवा पूर्ण प्रतिपादन संपते, न संपते, तोच त्याचा अनुवाद करणे. दुसरा म्हणजे, ते प्रतिपादन सुरू होताच काही क्षणांतच समांतर मौखिक अनुवाद करणे. **सलग** म्हणजे 'अ' प्रतिपादनात जेवढा सलगपणा असेल, किमान तेवढा सलगपणा मौखिक अनुवादात असावा, **यथार्थ** म्हणजे शब्दशः नव्हे (तरी यजमानपक्षाने शब्दशः अनुवादाचा आग्रह धरल्यास, तो तसा करावा.) सामान्यतः 'अ'प्रतिपादनातील शब्दांचे 'ब' त रूपांतर करायचे नसून, त्यातील प्रतिपाद्याचे करायचे असते. या दृष्टीने यथार्थ म्हणजे 'अ' मधील प्रतिपाद्याचे 'ब' मध्ये त्याच्या ढंग, संदर्भ, इ. सहित केलेले रूपांतर. जास्त नाही आणि कमीही नाही. अतिविस्तार व अल्पविस्तार हे दोन्ही दोषच. अनुवादकाच्या स्वतःच्या पदरचे काहीही मौखिक अनुवादात असू नये. याचे कारण मौखिक अनुवादक हा दोन पक्षांतला 'मध्यस्थ' नसून 'माध्यम' असतो. या दोन भूमिकांतील सूक्ष्म सीमारेषा सांभाळणे जितके महत्त्वाचे, तितकेच अवघड कसे, हे पुढे येईलच.

## २. मौखिक अनुवादाचे प्रकार व कार्यक्षेत्रे

सर्व व्यावसायिक अनुवादक सारख्याच प्रमाणात प्रशिक्षित, व्यासंगी, भाषासंपन्न, अनुभवी, संभाषणचतुर, बहुश्रुत, विशेषज्ञ, इत्यादी नसतात. तशी यजमान पक्षांची अपेक्षाही नसते. कमी–अधिक गुणवत्तेप्रमाणे अनुवादक साधारण, मध्यम व उच्च-श्रेणीचे असतात. प्रत्येक श्रेणीला अनुरूप अनुवादसेवेची कार्यक्षेत्रे असतात, तसेच प्रकारही असतात. हे प्रकार अनुवादकांच्या गुणवत्तेच्या चढत्या श्रेणीच्या क्रमाने पुढे वर्णिले आहेत.

### (अ) जनता संपर्क सेवा

हवाई अड्डे, विमाने, हॉटेले, अतिथिगृहे, स्वागत कक्ष, दूरध्वनी, संदेशवहन, प्रवासी आवक, जावक, इत्यादी क्षेत्रांत अनुवाद-सेवकांना मागणी असते. या क्षेत्रांत चालणाऱ्या व्यवहारांचा स्थूल उद्देश जनतासंपर्क करणे आणि गिऱ्हाइकांना सोय व सुविधा प्राप्त करून देणे असा असतो. म्हणून जुजबी व आंशिक स्वरूपाच्या अनुवादसेवेच्या साहाय्याने जरूर तितक्या प्रमाणात तो उद्देश साधला जातो.

उदाहरणार्थ, विमान–प्रवाशांचे आगत-स्वागत करणे, त्यांना आसनावर बसवणे, पट्ट्यात

'जखडणे', अडीअडीचणींत मदत करणे, खाऊपिऊ घालणे, इ. करून ध्वनिक्षेपकातून ठरावीक ठशाची माहिती ठरावीक वेळी दोन-तीन भाषांतून पुकारणे या हवाई स्वागतकर्त्यांच्या नित्याचे कामात अनुवादाचे काम अल्पांशच असते.

हॉटेले व अतिथिगृहांच्या स्वागत-कक्षातील कर्मचारी परभाषी पाहुण्यांना जरूर तेव्हा अनुवाद-सेवा पुरवू शकतात. पण त्याला मर्यादा असतात. ते काही त्यांचे मुख्य काम नव्हे. बाहेरून कराराच्या बोलीवर अनुवादकांना पाचारण करण्याचा रिवाज भारतातील पंचतारांकित हॉटेलांतून दिसून येतो.

हवाई-अड्ड्यांवरच्या सुरक्षा-व्यवस्थेत चोरट्या आयात-निर्यातीच्या चवकशी कार्यांत वेळप्रसंगी अनुवाद-सेवेची गरज भासते. गुन्हेगार परदेशी असेल, तर त्याची 'छानबीन' करण्यासाठी त्याच्या देशाच्या भारतात असलेल्या वकिलातीच्या अधिकाऱ्याला अनुवादकाचे काम करण्याची विनंती करतात. क्वचित प्रसंगी स्वदेशीय अनुवादकांना काम देतात.

दूरसंचार सेवेतील कर्मचाऱ्यांना परकीय भाषांचे जुजबी ज्ञान असल्यास दूरध्वनीने परदेशांशी संपर्क साधणे जास्त सुलभ होते, असा अनुभव आहे. या सर्वच जनता संपर्क क्षेत्रांत काम करणाऱ्या भारतीयांनी जरूर तेवढे संबंधित भाषांचे ज्ञान मिळविणे व वापरणे अधिकाधिक आवश्यक ठरणार आहे.

(व) **पर्यटन-सेवेचा भाग म्हणून अनुवाद-सेवा :**

भारतात खासगी व शासकीय प्रयत्नांमुळे पर्यटन सेवा-सुविधा वाढत आहेत. विशेषतः, परदेशी पर्यटकांसाठी प्रवास, आगत-स्वागत, निवास, भोजन, प्रबोधन, मनोरंजन, इत्यादींच्या खास व वाढीव सेवा-सुविधा उपलब्ध होत आहेत. अशा पर्यटकांचे त्यांच्या भाषेतून मार्गदर्शन करणाऱ्या पर्यटक-वाटाड्यांच्या अभ्यासक्रमात भाषांचे अभ्यासक्रम जोडण्यात येतात. इतर प्रकारे भाषाज्ञान मिळविण्यास त्यांना प्रोत्साहन मिळते. शिवाय जरुरीप्रमाणे खासगी भाषानुवादकांना बोलावून घेतात.

विविध राज्यांतील पर्यटन-स्थळांची उपयुक्त पण ठरीव साच्याची सचित्र माहिती-पत्रके काढण्यात येतात. पर्यटकांच्या मार्गदर्शक कर्मचाऱ्यांना त्या त्या भाषेत ठरावीक साच्याची माहिती पाठ करून घडाघडा बोलून दाखवणे अवघड नाही. तीच तीच तबकडी पुन्हापुन्हा वाजविण्याइतके सोपे आहे.

परंतु अशा सीमित भाषाज्ञानावर पोट भरता येते, म्हणून या क्षेत्रातील अनुवादकांनी आत्मसंतुष्ट राहू नये. पर्यटकाला 'तबकडी'बाहेरची माहिती कधीकधी हवी असते. परदेशी व परभाषी पर्यटकांचा निदान अल्पकालापुरता 'मित्र व सल्लागार' बनण्याची महत्त्वाकांक्षा धरावी. बोली परभाषेचे ज्ञान व सराव वाढवावेत. जमल्यास दोन-तीन परकीय भाषा आत्मसात करून आपल्या अनुवाद-सेवेचा व्यावसायिक दर्जा वाढवावा.

फ्रेंच, जर्मन, जपानी, रशियन व इतर भाषा शिकत असलेल्या विद्यार्थी-विद्यार्थिनींत अलीकडे पर्यटकांच्या मार्गदर्शकांचे काम स्वीकारण्याची वृत्ती दिसू लागली आहे. ही वृत्ती स्पृहणीय आहे. त्याला भाषाशिक्षण संस्थांकडून उत्तेजन व पाठबळ अवश्य देण्यात यावे. उदाहरणार्थ, भारतातल्या फ्रेंच शिकविणाऱ्या चवदा आल्यांस फ्राँसेझ या संस्थांपैकी काही आपल्या विद्यार्थ्यांना असे पाठबळ वा उत्तेजन देतात.

(क) **विवक्षित नैपुण्ययुक्त अनुवाद-सेवा**

परदेशी भांडवल, तंत्रज्ञान, तंत्रज्ञ, सल्लागार यांच्या साहाय्याने व सहभागाने भारतात खाजगी व सरकारी क्षेत्रात मोठ्या संख्येने औद्योगिक, व्यापारी, सांस्कृतिक, इ. प्रकल्प आढळतात. अलिकडच्या जास्त मोकळया आर्थिक धोरणामुळे त्यांत वाढ होत आहे. या प्रकल्पाच्या संदर्भात बोलणी, सल्लामसलत, करार-मदार वगैरे करण्यासाठी परदेशांतून विविध भाषा बोलणारांची ये-जा सतत चालू असते. त्यांत व्यापारी, उद्योजक, तंत्रज्ञ, शास्त्रज्ञ, संशोधक, शासनाधिकारी, प्राध्यापक, कलावंत, विद्यार्थी असे विविध क्षेत्रांतून लोक आलेले असतात. भारतात आपापला विवक्षित हेतू सीमित कालमर्यादित साधून त्यांना मायदेशी परत जायचे असते.

त्यांची सवड, हेतुविषय व अवगत भाषा लक्षात घेऊन भारतीय यजमान आगाऊच किंवा आयत्या वेळी संबंधित भाषानुवादकास पाचारण करतात.

या प्रकारची अनुवाद-सेवा देत असताना अनुवादकाची जबाबदारी फार मोठी का असते, याचे आकलन त्याला असावे लागते. याची मुख्य कारणे अशी : १. दोन्ही पक्ष अनुवादकावर विश्वास ठेवतात व विसंबून असतात. २. दोन्ही पक्षांतील बोलणी निर्णायक स्वरूपाची असतात; व नंतरच्या व्यवहाराला कलाटणी अथवा योग्य दिशा देणारी असतात. ३. त्या व्यवहारातील आर्थिक उलाढाल जेवढी मोठी आणि घ्यावयाचे निर्णय जितके मूलभूत, तितके त्या बोलण्यांचे महत्त्व अधिक. ३. बोलण्यांचे हेतुविषय जितके विवक्षित, सीमित व तांत्रिक,



अनुक्रमणिका

तितक्या प्रमाणात प्रतिपाद्यांचे अनुवादकाने दोन्ही भाषांत करावयाचे रूपांतर नेमके, आटोपशीर व अचूक असावे लागते. कसोटीस उतरून अनुवादकाला स्वतःची व्यावसायिक इभ्रत सांभाळायची असते.

विविध क्षेत्रांत विविध विषयांचे ज्ञान, पूर्वानुभव व दोन्ही भाषा वागविण्याचे कसब असलेल्या अनुवादकास अशी जबाबदारी पार पाडता येते. योग्य शब्दसंज्ञा, शब्दप्रयोग, गृहीत किंवा अध्याहृत संदर्भ व संकल्पना आणि प्रत्यक्ष व्यवहार या सगळ्यांची जाण व आठवण पक्की असावी लागते. नसल्यास किंवा अपुरी असल्यास, काम करता करताच नव्याने पक्की करावी लागते. किंबहुना भाषानुवादक आजन्म विद्यार्थीच राहतो व तसा तो राहावा, हे श्रेयस्कर.

कोणीही सर्वज्ञ नसतो. अनुवादकही सर्वज्ञ नसतो, पण असायला पाहिजे, अशी अपेक्षा मात्र त्याच्या अनुवाद-सेवेचा उपयोग करणारे दोन्ही पक्ष धरतात! निदान त्याच्या व्यवहाराच्या हेतुविषयापुरते तरी हे खरे आहे. पण हे हेतुविषय किती विविध, किती विपुल, किती नवनवीन! त्यांना अंतच नाही.

अनुभवी व निष्णात अनुवादकांना पूर्णपणे अपरिचित असलेले हेतुविषय वाट्याला येऊ शकतात. अशा वेळी दोन पर्याय असतात.[१] अनुवाद करण्याचे साफ नाकारणे. जमल्यास त्या हेतुविषयातील माहीतगार व्यवसाय-बंधुभगिनींचे नाव सुचविणे.[२] अनुवाद करण्याचे स्वीकारणे, अपरिचित हेतुविषयाची 'तयारी' करण्यास वेळ मागून घेणे व वा आमंत्रकाकडून समजावून घेणे. या नवीन विषय शिकण्याच्या पर्वणीचा अनुवादकाने पुरेपूर लाभ घ्यावा.*[२]

---

२. या 'पुरेपूर लाभाचा' एक किस्सा सांगण्यासारखा आहे :
एका इटालियन उद्योजकाने फ्रेंच कारखानदाराशी करार करून एका अत्याधुनिक फ्रेंच तंत्राचा वापर सुरू केला. अडचणी आल्या. काम थांबलं. म्हणून फ्रेंच कारखानदाराला सल्ला-मसलतीसाठी बोलावलं. पाचारित अनुवादकाला फ्रेंच भाषा अवगत होती. पण फ्रेंच तंत्र माहीत नव्हतं. मग ते फ्रेंच तंत्र इटालियन उद्योजकानं अनुवादकाला शिकविलं. त्यानंतर अनुवादाचे काम उत्तम तऱ्हेने पार पाडून एक लाख लिरांचं अनुवाद सेवेचं 'बिल' दिलं. ते वाचून इटालियन उद्योजकाने नवीन तंत्राच्या शिकवणीचं एक लाख लिरांचं 'बिल' अनुवादकाच्या हातावर ठेवलं!

अपरिचित हेतुविषय परिचित असल्याची बतावणी करणं हा अर्थातच पर्याय नव्हे! तो नैतिक अपराध व व्यावसायिक मूर्खपणा ठरेल. मात्र फार क्वचित प्रसंगी असं घडतं, की परिस्थितीच्या कचाट्यात सापडलेला एखादा यजमान वरील दोन्ही योग्य पर्याय धुडकावून देतो व गळ घालून अनुवादकाला बळेच अनुवाद-सेवेसाठी बोलावतो. अशा वेळी अडला नारायण पाय धरायला आल्याचीच भावना अनुवादकाला होते. प्रसंग बाका असतो. व्यवसायाशी अप्रामाणिकपणा केल्याचे पाप घडण्याचा धोका एका बाजूला, तर दुसऱ्या बाजूला 'सेवावृत्ती'. अनिच्छेने स्वीकारावे लागलेले काम पार पाडण्याच्या 'खास' क्लृप्त्या आहेत. त्या अशा :

१. 'अ' व 'ब' पक्षांना आपल्या हेतुविषयाच्या 'अज्ञानाची' सुरुवातीलाच कबुली देणे.

२. मग जेवढा व जसा जमेल, तेवढाच तसा अनुवाद करण्याचे आश्वासन देणे व ते पाळणे.

३. उभयपक्षांच्या निव्वळ शाब्दिक देवाणघेवाणीचा उत्तम अनुवाद साधणे.

४. असे करीत असता हेतुविषय समजावून घेण्यासाठी प्रश्न व शंका विचारणे.

५. टिपणे करणे व हेतुविषयाचा जसजसा परिचय वाढेल, तसतसे उभयपक्षांच्या तांत्रिक भाषेतच बोलायला सुरुवात करणे.

अनुवादकाच्या प्रामाणिक प्रयत्नांना उभय पक्षांची दाद मिळतेच व ते अनुवादकाला समजेल, अशा भाषेत बोलू लागतात; आणि 'प्रसंग' पार पडतो. सर्वांची 'सुटका' होते.

अनुवादकांची दुसरी समस्या अतीव दीर्घ व जलद प्रतिपानातून निर्माण होते. त्यात किचकट तपशिलाची भर पडली, तर विचारू नका! 'अ' व 'ब' पक्ष एकमेकांना समजावून घेण्याच्या उत्साहात चार-पाच मिनिटे बोलतच राहातात. त्या बोलण्याचे सुटसुटीत भाग करून अनुवादकाची सोय पाहत नाहीत. अशा प्रसंगी ती सोय आपली आपणच करून घ्यावी. धावती टिपणे करावीत, (विशेषतः, नावांची जंत्री, तांत्रिक तपशील, आकड्यांत दिलेली माहिती, इ.) नेत्रसंकेताने अथवा स्पष्ट विनंती करून टप्प्याटप्प्यावर बोलणाऱ्या पक्षाला थांबवावे. तेवढ्या टप्प्याचा दुसऱ्या भाषेत अनुवाद करून, पुन्हा त्या पक्षास बोलणे सुरू करण्यास सांगावे. ऐकण्यातून वा स्मरणातून सुटलेला तपशील विचारून घ्यावा. किंबहुना प्रथमपासूनच 'अ' व 'ब' पक्षांच्या बोलण्यावर व देवघेवीवर खेळीमेळीने नियंत्रण ठेवावे. अनुवादाचे काम सोपे करावे. उभयपक्षांना अनुवाद-सेवा करवून घ्यायची सवय असल्यास वरील समस्या उद्भवत नाही.

तिसऱ्या प्रकारची समस्या क्वचित वेळा गंभीर होऊ शकते. अनुवादकाच्या 'माध्यम' आणि 'मध्यस्थ' या भूमिकांतील सीमारेषेला ही समस्या छेदून जाते. म्हणून अनुवादकाने सावध असावे. होते काय, की 'अ' वा 'ब' पक्षांकडून असमंजस वर्तन वा भाषण होते. प्रत्येकजण आपल्या म्हणण्याला चिकटून बसतो. परिणामी वाद, भांडण, आरोप-प्रत्यारोप, धमक्या, अपशब्द वगैरे.

अशा प्रसंगी अनुवादकाचे केवळ 'माध्यमाचे काम करणे' अथवा 'मूक साक्षीदार' राहणे सारखेच अवघड असते. प्रश्न असतो, की एका भाषेतील धूळफेक दूसऱ्या भाषेतून करावी, न करावी. दुसऱ्या बाजूने दोन्ही पक्षांत 'मध्यस्थी' करणे अनुवादकाच्या भूमिकेत व आचारसंहितेत बसत नाही. अशा दुहेरी कचाट्यातून न खरचटता बाहेर पडण्याच्या क्लृप्त्या असतात. बोलणी थांबली–(आणि ती थांबतातच.), की प्रत्येक पक्षास वेगळे गाठून चर्चा केल्यास मध्यम मार्गाचा तोडगा सापडू शकतो. दोन्ही पक्षांची मलावण केल्यास त्यांची समझोता करण्याची तयारी आजमावता येते. साधारणपणे अशा भांडणात ज्या पक्षाचे नुकसान अधिक, त्या पक्षाचा समेट करण्याकडे कल अधिक.

समेट घडून येतो किंवा नाही, यापेक्षा जास्त महत्त्वाचा प्रश्न असा, की अनुवादकांनी अशी 'शिष्टाई' करावी, का न करावी, यावर व्यावसायिकांत एकमत नाही, वाद आहेत. 'मध्यस्थी' टाळणारांचाच पक्ष मोठा आहे. परंतु व्यावहारिक तारतम्याने विचार करता असे दिसते, की ज्या अनुवादकांपाशी धीटपणा, वाक्‌चातुर्य व यशस्वी समझोत्याचे तोडगे तयार असतात, त्यांनी 'मध्यस्थी' केल्यास ते क्षम्य ठरते.

या म्हणण्याच्या समर्थनार्थ एकच कारण दिले तरी ते बोलके आहे. ते असे, की दोन्ही पक्षांतील भांडण विकोपास जाऊन त्यांच्यांतील बोलणी, वाटाघाटी उधळून जाणे ही घटना दोन्ही पक्षांना हानिकारकच. पण त्या भांडणाचे 'खापर' अनुवादकाच्या डोक्यावर जर का फुटले, तर ते त्याला अधिक हानिकारक ठरू शकते. या संभाव्य धोक्याला आधीच पायबंद घातलेला बरा असतो. (या लेखाचे शेवटी या बाबतीतला एक अनुभव दिला आहे.)

सारांश, विवक्षित नैपुण्ययुक्त भाषानुवाद वरच्या श्रेणीचा असतो. ज्यांचेपाशी अनुभव, भाषांवर उत्तम पकड, शीघ्र ग्रहणशक्ती, बहुश्रुतता, आत्मविश्वास, धीटपणा, इत्यादी गुण असतील, अशा अनुवादकांनी ही सेवा करण्याचे स्वीकारावे.

हे गुण आत्मसात करून जोपासण्याचा एक मार्ग म्हणजे **अनुवादकाने विषयक्षेत्र निवडून, त्यात विशेष निपुणता** (Specialisation) **मिळवावी व त्यातच राहून आपले अनुवाद-कौशल्य घटवावे.** हा मुद्दा पुढील भागांत विचारात घेतला आहे.

(ड) **समूह संबोधन-अनुवाद** (Conference Interpretation)

या प्रकारच्या भाषानुवादाच्या सेवेचे प्रयोजन चर्चासत्रे, अभ्याससत्रे, प्रशिक्षणसत्रे, व्यावसायिक विशेषज्ञांचे मेळावे, राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय परिषदा, इत्यादी प्रसंगी केलेले आढळते. अनुवादाचे हेतुविषय जास्तकरून तांत्रिक, बौद्धिक, सांस्कृतिक अशा स्वरूपाचे असतात. त्यांत आर्थिक वा व्यापारी स्वरूपाच्या विषयांचा भाग बहुतेक करून असल्यास अल्प व गौण असतो. अशा परिषदांत सहभाग जास्त करून उच्चभ्रू, अतीव सुसंस्कृत, बुद्धिजीवी, विशेषज्ञ, बहुश्रुत, राजकारणपटु, आदींचा जास्त प्रमाणात असतो. हे प्रौढ प्रथितयश, पदाधिकारी व अत्यंत सुखवस्तू अशा समाजाच्या वरच्या थरातले असतात. पण याठिकाणी त्यांचा विशेष उल्लेखनीय गुण, म्हणजे हे महाभाग भाषेचा समर्थ व काटेकोर वापर करण्यात व करविण्यात पटाईत असतात. त्यांची योग्य शब्द व अभिव्यक्ती यांवर जितकी भक्ती असते, तितकीच अयोग्य भाषाप्रयोगांची त्यांना घृणा असते.

भाषानुवादकाच्या दृष्टीने अशा उच्च प्रतीच्या यजमानांना अनुवाद-सेवा देण्याचा योग ही एक पर्वणी असते, तसेच ते एक आव्हानही असते. त्याच्या भाषाज्ञान- साधनेची, अनुभवाची आणि कौशल्याची कसोटी लागते. याचे आणखी जास्त महत्त्वाचे कारण, हे की अशा अतिसुजाण प्रतिष्ठितांना अनुवाद–सेवा देण्याची सर्वमान्य पद्धती वापरणे फार कठीण काम असते. ते कसे, ते पाहा.

ही पद्धती म्हणजे समसमांतर व सलग भाषानुवाद (Simaltaneous and continuous interpretation). समसमांतरपणा व अखंडता हे नुसते वर्णन नसून या प्रकारच्या अनुवाद-सेवेचे ते व्यावसायिक दंडक आहेत. वक्ता 'अ' भाषेत बोलू लागला, की अनुवादक **जवळजवळ त्याच क्षणी** 'ब' भाषेत त्याचा अनुवाद करू लागतो. याअर्थी तो समसमांतर असतो. जणू काही एका भाषेतील उच्चारिताचा दुसऱ्या भाषेतील 'झटिति' येणारा प्रतिध्वनीच! दुसरे असे, की असा अनुवाद 'सलग' पाहिजे. याचा अर्थ असा, की वक्ता त्याच्या 'अ' भाषेत बोलत राहतो व त्याचा 'ब' भाषेत अनुवाद व्हावा व तो पूर्ण व्हावा, म्हणून आपले भाषण 'खंडित' करीत नाही. अनुवादकानेही तशी अपेक्षा वा विनंती करावयाची नसते. म्हणजे वक्ता व अनुवादक आळीपाळीने बोलण्याची क्रिया करीत नाहीत.

या पद्धतीत वक्त्याची 'सोय' जास्त करून पाहिली जाते. त्याचे विचार, अभिव्यक्ती व त्यांचा ओघ 'अखंड' व निर्वेध ठेवण्यासाठीच अनुवाद कार्याने इतर प्रकारांत होणारी 'रुकावट' येथे टाळलेली असते. आपण पाहिलेच आहे, की आधीच्या प्रकारात 'अ' व 'ब' पक्षांना आळीपाळीने 'अ' तून 'ब' त आणि 'ब' तून 'अ' अनुवाद पूर्ण होईतोपर्यंत थांबावे लागते व अनुवादकाची 'सोय' करावी लागते. ती न झाल्यास अनुवादक ती सोय-सवलत उभयतांकडून मागून घेऊ शकतो.

तुम्ही म्हणाल, समसमांतर व सलग भाषानुवाद हा अशक्य कोटीतला वाटतो. मौखिक अनुवादक हा अंतर्ज्ञानी किंवा जादुगार असला पाहिजे! त्याला वक्त्याच्या मनातले विचार आधीच कसे समजतात? 'अ' भाषेतील प्रतिपादन ऐकल्यावर ते समजायला आणि ते समजल्यावर 'ब' भाषेत यथार्थ अनुवादित करण्यास काहीतरी वेळ लागणारच, की नाही? असा हा समसमांतर अनुवाद करणे कसे काय शक्य आहे?

या शंका योग्यच आहेत. पण त्यांचे निरसन करण्यासाठी आपल्याला अशा प्रकारच्या अनुवादसेवेच्या संयोजनाकडे जावे लागते. मोठमोठ्या परिषदांच्या संयोजकांना अनुवाद-सेवेचे पद्धतशीर संयोजन इतर व्यवस्थेबरोबरच करायचे असते. ते असे :

१. उच्च कसोट्यांना उतरलेल्या[३] अनुभवी व कुशल अनुवादकांची निवड करून त्यांची करारपत्र देऊन नेमणूक करतात.

---

३. वरील विवेचन संयुक्त राष्ट्रसंघाच्या (युनो) पॅरिस येथे काम करणाऱ्या सांस्कृतिक मंडळाच्या (युनिस्को)च्या संदर्भात केले आहे.

अनुवादकांच्या अत्युच्च कसोट्या घेऊन प्रमाणपत्र देणाऱ्या संस्था युरोपात आहेत. त्यांतील काही नावाजलेल्या अशा आहेत. उदा., एकोल स्युपेरिअर दँतेरप्रेत एद त्राद्युक्सर, पॅरिस. (ESIT) अँस्तित्यू स्युपेरिअर त्राद्युक्सिकों ए दँतेरप्रतासिंओं, स्त्रासबूर्ग व बझाँसों; व स्वित्झरलंड, जर्मनी, हॉलंड, इंग्लंड, रशिया, इ. देशांतही चांगल्या संस्था आहेत. भारतात दिल्लीला जवाहरलाल नेहरू विद्यापीठात व हैदराबादला निव्वळ भाषा-अनुवादाचे पदव्युत्तर अभ्यासक्रम उपलब्ध आहेत.

विशेष उल्लेखनीय अशा जिनीव्हातल्या International Association of Conference Interpreters अशी व्यावसायिकांची संस्था आहे. I.A.C.I. चे सभासदत्व मिळवायचे झाल्यास काही शेकडा तास राष्ट्रीय-आंतरराष्ट्रीय परिषदांत समसमांतर व सलग मौखिक अनुवाद केल्याची अधिकृत नोंद दाखवावी लागते. या सभासदत्वाचा मान भारतात फक्त दोन महिलांना लाभला आहे. त्यांतली एक महाराष्ट्रीयन आहे. याचा सर्वांना अभिमान वाटेल.





अनुक्रमणिका

२. विविध भाषा व विविध हेतुविषयवार अनुवादकाचे गट करतात. प्रत्येक गटाच्या लक्ष्य भाषातज्ज्ञांचे हेतुविषयवार उपगट करतात. उदा.,

| **लक्ष्य भाषागट** | **उपगटातील हेतुविषय** |
|---|---|
| अ. फ्रेंच | १. समाजशास्त्रे, २. भौतिकशास्त्रे, ३. यंत्र-तंत्रज्ञान, इ. |
| ब. इटॅलियन | १. वाङ्मय, २. कला, ३. इतिहास, इ. |
| क. रशियन | १. अंतराळ, २. अणुविज्ञान, ३. वैद्यकशास्त्र, इ. |

३. **ज्या भाषेत अनुवाद करायचा, ती अनुवादकाची मातृभाषा असावी,** असा नियम आहे.

४. संबंधित उपगटांतील अनुवादकांस संयोजक आगाऊ सूचना देऊन हेतुविषयाच्या माहितीचा अभ्यास करण्यास पुरेसा वेळ, ग्रंथसाहाय्य देतात.

५. अनुवादकांचे काम करण्याचे आसन निःशब्द काच-कुटीत असते. काचेपलिकडल्या वक्त्याला पाहणे, कानांतल्या श्रवणिकेतून त्याचे भाषण ऐकणे व समोरील टिपणे चाळून एकाग्रचित्ताने लक्ष्य भाषेत समसमांतर व सलग अनुवाद करणे अशी आदर्श व्यवस्था संयोजक करतात.

या व्यवस्थेत अनुवादकाची सोय पाहिलेली असते. त्यामुळे त्याचे काम सोपे व आल्हाददायक होते. कालांतराने तो रुळतो. सुरुवातीला अशक्य वाटणारे शक्य व त्याच्यापुरते ते काम 'सामान्य' व सवयीचे असे होते.

तरी ते असामान्यच असते. असे काम करण्याची संधी मिळावी, ही महत्त्वाकांक्षा चांगल्या प्रतीचे अनुवादक मनात बाळगून असतात. भारतात थोड्या अनुवादकांना याची माहिती, जाण अथवा चाड असते. जास्तीत जास्त परिषदा दिल्लीत भरतात. त्यामुळे इतर शहरांतल्या अनुवादकांना सामूहिक संबोधनाच्या अनुवाद सेवेचा अनुभव भरपूरच काय, पण किमान सुद्धा नसतो. असे सांगून हे काम दिल्लीतल्या भाषानुवादकांची मिरासदारीच झाली आहे, हे म्हणणे योग्य नाही. इतर शहरांतल्या व्यावसायिक अनुवादकांनी संघटित होऊन राज्यशासनाच्या मदतीने दर्जेदार अनुवाद-सेवा पुरवण्याची हमी घेतली, तर या कोंडीतून मार्ग निघू शकेल. भारतात होणाऱ्या आंतरराष्ट्रीय परिषदांचे परदेशांतील संयोजक इतर शहरांचा विचार करू लागतील. यासंबंधीचे करार-मदार दिल्लीत अडकून पडणार नाहीत.

प्रस्तुत लेखकाचे हे मत निव्वळ स्वप्नरंजन आहे, की शक्यतेच्या कोटीतले आहे, हे भारतातल्या व्यावसायिक अनुवादकांनीच ठरवायचे आहे.

**४ अनुवाद-सेवेची व्यावसायिक संघटना**

येथून पुढच्या विवेचनात जरूर तेथे अनुवादसेवेचा अर्थ शिथिल व समावेचक करून त्यात मौखिक आणि लिखित या दोन्ही सेवांचा विचार केलेला आहे. भारतात अनुवाद-सेवेच्या व्यावसायिक संघटना जास्त करून जास्तीत जास्त निव्वळ नफा आणि कमीत कमी भांडवली गुंतवणूक या व्यापारी तत्त्वावर केलेल्या आढळतात. त्यांत मुख्यतः दोन प्रकार आढळतात.

(अ) **निव्वळ व्यापारी अनुवाद - दलाल**

एक खाजगी व्यवसाय उपजीविकेसाठी करणारे हे दलाल स्वतः भाषानिपुण असतातच, असे नाही. ते स्वतः लिखित किंवा मौखिक अनुवाद करतातच, असेही नाही. सुरुवातीला करीत असले, तर धंद्याचा व्याप व फायदा जसजसे वाढतात, तसतसे त्यांचे श्रेय वेळ दलालीच्या कामातच खर्ची पडतात. भाषाभ्यास, सराव अथवा अनुवाद यांनाच काय, पण दुसऱ्यांकडून करून घेतलेल्या कामाची प्रत वा दर्जा तपासण्यासही दलालांना वेळ मिळत नाही. जास्तकरून होतकरू अनुवादक स्त्री-पुरुषांकडून ही सेवा करविण्यात येते. वर उल्लेखिलेल्याप्रमाणे अनुवादकांकडून शे.१० ते ६० टक्के (किंवा जास्त) दलाली वसूल करून अनुवादाचा मोबदला देण्यात येतो. अनुवादकांना श्रमाची वाजवी मिळकत दिली जात नाही, असेच चित्र बहुतकरून पाहायला मिळते.

तरी सुद्धा अनुवाद-सेवा दलाली तत्त्वावर संघटित करून ती गिऱ्हाइकांना (व्यापारी, उद्योजक, पर्यटक, शासन, इ.) ठोस हमी देऊन पुरविणे ही एक स्वतंत्र आणि उपयुक्त सेवा आहे, हे नाकारता येणार नाही. अनुवाद-व्यवसायात खासगी दलालीचा धंदा लाभकारक व चुरशीने वाढणारा आहे, यावरून त्याची उपयोगिता दिसतेच; परंतु महत्त्वाचा प्रश्न हा आहे, की अनुवाद-सेवेचा दर्जा सुधारणे, त्याचे प्रमाणीकरण करणे, अनुवादकांना प्रशिक्षण देणे, ग्रंथसाहाय्य करणे इ.बाबींकडे होत असलेले दुर्लक्ष कोण व कसे टाळणार,

(ब) **अनुवाद सेवांच्या सहकारी संस्था :**

यावर उपाय म्हणून व्यावसायिक अनुवादकांनी एकजूट करून **प्रत्येक भाषेच्या सहकारी**

**तत्त्वावर संस्था** काढाव्या. प्रस्तुत लेखकाने १९८६ साली F.T.A.A.B.[४] ही अनुवादकांची संस्था फ्रेंच वकिलातीच्या प्रोत्साहनाने सुरू करण्यात व चालविण्यात पुढाकार घेतला आहे. ANUVAD या नावाचे षाण्मासिक व्यावसायिकांसाठी चालविले जाते. बाँबे ट्रस्ट ॲक्टखाली ही संस्था नोंदली आहे. भारतात निव्वळ व्यावसायिक अनुवादकांनी 'ना नफा, ना तोटा' अशा सहकारी तत्त्वावर चालविलेली अशी ही पहिलीच संस्था आहे. तिच्या कार्यपद्धतीचा आजपर्यंतचा अनुभव व्यावसायिकांना उद्बोधक ठरेल, असे वाटते.

FTAAB च्या घटनेत मुख्य उद्दिष्टे दोनच : १.नियमितपणे अभ्यासगटांत, चर्चासत्रांत व उच्च प्रतीच्या अभ्याससत्रांत सक्रिय भाग घेऊन फ्रेंच अनुवाद-सेवेचे सभासदांचे ज्ञान व कौशल्य यांत उत्तरोत्तर सुधारणा घडविणे. २. सभासदांच्या समाईक उपयोगासाठी शब्दकोश, ग्रंथ, पुस्तिका, तांत्रिक शब्दावल्या, नियतकालिके, इ.साहित्याने सुसज्ज असे ग्रंथालय सभासदांकरिता चालविणे.

संस्थेच्या नियमांत दिलेल्या दुय्यम व पूरक उद्दिष्टांप्रमाणे सभासदास सल्लासाहाय्य देणे; त्यांचा हिताचे रक्षण करणे, देणग्या, अनुदाने, सभासद-शुल्क, इत्यादी स्वरूपांत भांडवलसंचय करून त्याचा उपयोग सभासदांच्या व्यवसायात व व्यवसायपैपुण्यात वाढ व सुधारणा यांसाठी करणे, इ.सभासदांना किमान वीस वर्षांचा व्यावसायिक अनुभव असावा. नियमित अभ्यास, चर्चा, सल्लामसलत व प्रशिक्षण यांयोगे अनुवाद-सेवेचा दर्जा सुधारण्यात संस्थेला यश मिळाले आहे. तसेच, संस्थेकडे येणाऱ्या अनुवाद-सेवेच्या निरंतर येणाऱ्या मागण्या सभासद आळीपाळीने पुऱ्या करतात. प्रत्येक सभासदाला नियमित काम व आर्थिक मोबदला मिळत राहतात.

सारांश हा, की जर्मन, रशियन, स्पॅनिश, इटालियन, चिनी, जपानी, इ. भाषानुवादकांनी आपापली भाषानिहाय व सहकारी तत्त्वावर अशी अभ्यासमंडळे चालवावीत. यांत अपरिमित लाभ व कल्याण होईल. हेवेदावे व चुरशीच्या ठिकाणी सुरक्षितता व परस्पर साहाय्याची वृत्ती येईल. एकांडे शिलेदाराची घातक सवय जाऊन स्वतःचे भाषांचे ज्ञान व अनुवाद-कौशल्यात

४. French Translators' Advancement Association of Bombay. तसेच पुणे येथे आल्याँस् फ्रॉन्सेझ्च्या मदतीने १९९२ साली French Translators' Advancement Association of Pune भारतातल्या आणखी दहा शहरांत अशा प्रकारच्या संस्था काढण्याचे प्रयत्न चालू आहेत.

वाढ व सुधारणा करण्याचे नवीन मार्ग सापडतील. निरंतर स्वाध्याय व प्रशिक्षणाचे महत्त्व पटले व लाभ मिळू लागले, म्हणजे व्यवसायात पीछेहाट टळेल.

### ५. अनुवादकाचे शिक्षण-प्रशिक्षण

अशा शिक्षण-प्रशिक्षणाची सोय भारतीय विद्यापीठांत जेमतेम वीस वर्षांपूर्वी सुरू झाली. आज सुद्धा ती मोजक्याच विद्यापीठांत आहे. दिल्लीचे जवाहरलाल नेहरू विद्यापीठ आघाडीवर आहे. तेथे अनुवाद सेवा शास्त्र व कलेचे पदव्युत्तर अभ्यासक्रम चालविले जातात. हैदराबाद येथे C.I.E.F.L.[५] या भाषाशिक्षण संस्थेतही युरोपीय भाषांच्या पदव्युत्तर अभ्यासक्रमांत अनुवाद-शास्त्र व कला शिकवितात. आपल्या इतर काही विद्यापीठांत अलीकडेच काही युरोपीय भाषांच्या पदव्युत्तर अभ्यासक्रमांतच अनुवाद-विषय अंतर्भूत केला आहे. तरी सुद्धा सर्वसाधारणपणे परदेशी भाषांच्या विद्यापीठीय अभ्यासक्रमात निव्वळ भाषा आणि वाङ्मय यांवरच भर अधिक. परदेशी भाषा शिकल्यावर अनुवाद-कौशल्य 'आपोआप' येऊ लागते, ही गैरसमजूत हळूहळू लयास जाते आहे, हीच एक समाधानाची बाब आहे.

भारतात येत्या पन्नास-शंभर वर्षांत व्यावसायिक अनुवाद-सेवेची मागणी झपाट्याने वाढत जाणार, यात काहीच शंका नाही. याला अनुलक्षून परदेशी भाषांच्या अभ्यासक्रमांना संलग्न असे भाषानुवाद शास्त्र व कला यांचे अभ्यासक्रम सुरू करणे अगत्याचे आहे, याची जास्तीत जास्त विद्यापीठांनी नोंद घ्यावी व तसे प्रयत्न सुरू करावेत.

पुढील काळात येणारी अनुवाद-सेवेची मागणी इंग्रजी एका बाजूला युरोपीय व आशियाई भाषा दुसऱ्या बाजूला, अशा साच्यात अडकून न पडता राष्ट्रीय भाषा हिंदी व भारतीय प्रादेशिक भाषांना येऊन भिडणार आहे, असेही बदलते चित्र दिसू लागले आहे. कोणत्याही अनुवादकाला किमान दोन भाषांत अभ्यास व सराव करुन दोन्हींत नैपुण्य मिळवावे लागते, एक 'उगम'भाषा व दुसरी 'लक्ष्य' भाषा. उलट-सुलट अनुवादांत या भाषांची अदलाबदल होते. (उदा., चिनी-मराठी/ मराठी-चिनी, तामीळ- जपानी/ जपानी/तामीळ, बंगाली-रशियन/ रशियन-बंगाली, हिंदी- स्पॅनिश/ स्पॅनिश हिंदी, इत्यादी.)

'मागणी तसा पुरवठा' हे तत्त्व ध्यानात घेऊन अशा असंख्य भाषा-जोड्यांवर बेतलेले अनुवाद-शास्त्र व कलांचे शिक्षण व प्रशिक्षण देण्याचे अभ्यासक्रम क्रमाक्रमानेच व जरूर पडेल

---

५. Central Institute of English and Foreign Languages, Hyderabad - 500 007.

तसे आखणे व चालविणे हे प्रचंड आव्हान आहे. संघभाषा हिंदीला अग्रक्रम देऊन जरी तिच्या युरोपीय व आशियाई भाषांशी जोडणी केली, तरीही ते एक मोठे आव्हान ठरेल.

कसे असले, तरी हे कल्पनारंजन बाजूला ठेवून सांप्रतच्या परिस्थितीत कसलीही वाट न पाहता भारतातल्या व्यावसायिक अनुवादकांनी संघटित होऊन सहकारी तत्त्वावर भाषानिहाय स्वाध्याय मंडळे काढून आपले पुनर्शिक्षण आणि प्रशिक्षण आपल्याच हातांत घ्यावे, असे पुन्हा सांगावेसे वाटते. नाही तर त्यांची पिळवणूक होत राहणार आणि व्यावसायिक नैपुण्याचा दर्जा खालावत जाणार.

**६. अनुवाद-व्यवसाय : काही व्यथा व अपेक्षा**

मागणीप्रमाणे पुरवठा करतो, तो व्यावसायिक. डॉक्टर, वकील, अध्यापक, शास्त्रज्ञ, तंत्रज्ञ, इत्यादींप्रमाणेच अनुवादक हा एक व्यावसायिक आहे. परन्तु भारतात त्याची समाजमनातील प्रतिमा अपूर्ण व अस्पष्ट आहे. समाजाच्या वरच्या थरात, विशेषतः जेथे अनुवाद, सेवेची गरज भासते, तेथे परिस्थिती जरा बरी आहे. तरीसुद्धा पाश्चात्त्य व इतर काही देशांप्रमाणे आपल्या देशात अनुवाद-व्यवसायाला तितकीच प्रतिष्ठा व मान मिळायला काही अवधी लागणार आहे. आपल्या व्यवसायाच्या व्यथा दूर करून समाजाच्या अपेक्षा पूर्ण करण्याची जबाबदारी अनुवादकांवरच बव्हंशी का, हे थोडक्यात सांगता येईल.

(अ) शिक्षणक्रमातील त्रुटींमुळे साधारण भारतीय अनुवादक तोकड्या तयारीवरच व्यवसाय सुरू करतो. उगम आणि लक्ष्यभाषांपैकी कोणतीच त्याची मातृभाषा नसते. (उदा., इंग्रजी-फ्रेंच, स्पॅनिश, इटालियन, जर्मन, जपानी, चिनी, इ.) ही परिस्थिती मुळातच अनैसर्गिक व म्हणून अनुवादाचा दर्जा उंचावण्यासाठी या भाषांतर **पूर्ण प्रभुत्व मिळविले पाहिजे.**

(ब) हे करण्यासाठी संबंधित देशांत वास्तव्य व शिक्षण मिळणे. फारच थोड्यांच्या वाट्याला येते. भारतात परतल्यावर त्या शिक्षणाचा उपयोग व पाठपुरावा न केल्यास भाषाज्ञान गंजते.

(क) धंद्यातील कठोर स्पर्धा, हेवेदावे, जलद कमाई करण्याची निकड, इ. कारणांनी बहुसंख्य भारतीय अनुवादक एकांडे पण 'भिडस्त शिलेदार' असतात. व्यवसाय बंधुभगिनींना आदर दाखविणे, मदत करणे अशा गोष्टी विरळाच. अशा वैमनस्य व उदासीनतेवर घातलेले 'अहं विशेषः' भावनेचे पांघरूण हीच स्वसंरक्षाची दुबळी ढाल पुढे करून कितीतरी अनुवादक

या व्यवसायात वावरताना दिसतात. त्यात पुष्कळ पैसा कमावणारे **'यशस्वी'** अनुवादकही असतात.

(ड) एकजूट नसल्यामुळे अनुवाद-व्यवसायाशी बांधिलकीची भावना फारच अल्पसंख्य भारतीय अनुवादकांत आढळते. मग त्या व्यवसायाची प्रतिमा आणि प्रतिष्ठा सुधारण्याचे वैयक्तिक प्रयत्न करणे दूरच राहिले.

(इ) अनुवाद-सेवेचा योग्य तऱ्हेने उपयोग करणे आणि अनुवादकास योग्य वागणूक देणे यांबद्दल उपभोक्ता वर्गांत ('गिऱ्हाइकांत') बरेच अज्ञान व बेपर्वाई आढळते. (उदा., अनुवाद-सेवेचा मोबदला देण्यास विलंब करणे, अपुरा देणे, अजिबात न देणे, अनुवादकांना वेठबिगारांची वागणूक देणे, अनुवादकांची पगारी नोकरी करणारांकडून इतर चिल्लर कामे करून घेणे, इ.)

(फ) संबंधित भाषांतले शब्दकोश, संदर्भग्रंथ, पुस्तके, मासिके, वर्तमानपत्रे, इत्यादिकांचा नियमित लाभ घेणारे व्यावसायिक अनुवादक फारच विरळा. भाषाभ्यासाची ही साधने महाग असतात, दुर्मीळ असतात, याहीपेक्षा जिज्ञासा, विद्यार्थिवृत्ती व कठोर व नियमित बौद्धिक परिश्रम करण्याच्या वृत्तीचा लोप हेच या अनास्थेचे प्रमुख कारण आहे.

आणखी पुष्कळ व्यथा सांगता येतील. वानगीदाखल एवढ्या पुरेत. येते पुनश्च हे आवर्जून सांगितले पाहिजे, की या व अशा व्यथा दूर करण्यासाठी भाषानुवादकांनी वैयक्तिक व संघटित प्रयत्न केले पाहिजेत व या व्यवसायाची सर्व बाजूंनी उन्नती साधण्याकरिता सहकारी संस्था स्थापून चालविल्या पाहिजेत.

व्यथांनंतर काही उद्‌बोधक कथा.....

**७. अनुवाद-सेवेतील उद्‌बोधक अनुभव**

(अ) अल्जीरियात एके दिवशी फ्रेंच अनुवाद करीत होतो. आमचे भारतीय संस्था-चालक कराराच्या घट्ट चौकटीत राहून बोलणी करीत होते, तोपर्यंत उभयपक्षी अडचण नव्हती. माझे अनुवादाचे काम सुरळीत चालले होते. पण नंतर ती चौकट सोडून आमचे चालक पुनःपुन्हा अवास्तव मागण्या करू लागले. अल्जीरियन अधिकाऱ्याने त्या मागण्या पुनः पुन्हा धुडकावून लावल्या. तरी आमचे चालक त्या मागण्या करीतच राहिले. पाचव्या वेळेला अल्जीरियन

अधिकारी मजवर खेकसले. 'देवधर, तू इंग्रजीत बरोबर करतो आहेस ना?' मी दोघांकडे बघून खो खो हसू लागलो. मग आम्ही तिघेही खो खो हसत सुटलो. ती बोलणी कराराच्या चौकटीत आनंदाने पार पडली.

(ब) मुंबईजवळ एका गावात संगणक-चलित कापडमाग जुळविण्याचे काम चालू होते. इटालियन यंत्रतंत्रज्ञानाच्या सूचना मी आपल्या गिरणीकामगारांना हिंदी भाषेतून सांगत होतो. अवघ्या दोन दिवसांत १० कापडमाग जुळवून झाले व कापड-उत्पादन सुरू करण्याची वेळ येऊन ठेपली. इटालियन तंत्रज्ञ स्वतःच्या व एका विशेष तरबेज कामगारावर इतका खूश झाला, की त्याला मागे एक लाथच मारली. परिणाम उलटा झाला. काम थांबलं. हमरी-तुमरीवर येऊन तो कामगार इटालियन तंत्रज्ञाशी भांडू लागला. बाकीचे त्याला सामील झाले. 'माध्यम' आणि 'मध्यस्थ' या दोन्ही भूमिका करून मी ते भांडण सोडविले. उत्पादन सुरू झाले, तशी तो इटालियन गाऊ, नाचू लागला, टाळया पिटू लागला. मी त्याचेपासून दहा पावलं दूर सरकलो व टाळ्या पिटू लागलो. काही इटालियन लाथ मारून कौतुक करतात, हे नवीन ज्ञान मला झाले होते.

(क) जर ऑईल एंजिनच्या अश्वशक्तीची टप्प्याटप्प्याने वाढ करून तसली इंजिने फ्रेंच गिऱ्हाइकांना विकायची झाल्यास शक्तीच्या प्रत्येक वाढीव टप्प्याला इंजिनांची वाढीव किंमत काय राहील? हा माझ्या फ्रेंच अनुवादाचा हेतुविषय होता. भारतीय उद्योजक अश्वशक्तीच्या प्रत्येक आंशिक वाढीची (Fractional HP) प्रमाणाबाहेर जास्त वाढीव किंमत मागतो आहे, असे फ्रेंच गिऱ्हाइकाचे म्हणणे या मुद्द्यावर तपशीलवार व दीर्घ वाटाघाटीनंतरही उभयपक्षांत मतभेद टिकून राहिले. बोलणी थांबली. तडजोड निघेना. काही अवधी शांतता राहिली. मग चिरडीस आलेल्या फ्रेंच गिऱ्हाइकाने माझे कानात सांगितले, 'देवधर, तुझ्या मालकाला सांग, की तो घोड्यांचा व्यापार (Horse trading) उत्तम करू शकेल.' या मिस्किल फ्रेंच प्रतिपाद्याचा मी इंग्रजीत 'अनुवाद' केला, 'आपण व्यापारी करार-मदार करण्यांत फारच निष्णात आहात, असे आपला फ्रेंच मित्र म्हणतो आहे.' हे ऐकून भारतीय उद्योजक खूश झाला. बोलणी पुन्हा सुरू झाली. तडजोड निघाली, प्रसंग निभावला.

(ड) हैदराबादला स्पॅनिश बनावटीचे संगणकचलित यंत्रावजार (Machine tool) पंधरा लाख रुपयांना विकत घेऊन एक छोटा उद्योजक चालवू पाहत होता. तो अर्धशिक्षित बेकार तरुण होता. बँकेचे कर्ज होते. दोन महिने खटपट करूनही यंत्रावजार नीट चालेना. कापून घासले घिसले, तरी विविध आकारांचे पोलादी तुकडे प्रमाणित होईनात. कागदावरील

रेखाचित्रांतील प्रमाणे व ते तुकडे यांच्यांतील आंशिक मिलिमीटरची तफावत काही केल्या दूर करता येईना. असे सदोष पोलादी तुकडे गिऱ्हाइके घेईनाशी झाली. धंदा बुडीत जाऊ लागला. या स्थितीत दोन स्पॅनिश तज्ज्ञांना पाचारण केले. दोन दिवस प्रयत्न केल्यावर त्यांचे लक्षात आले, की यंत्रावजाराचा संगणक त्या छोट्या उद्योजकाने बिघडवून ठेवला होता. पण त्याचे म्हणणे तो संगणक पुरविला गेला, तोच मुळात सदोष होता. स्पॅनिश तज्ज्ञांकडे दुसऱ्या नवीन व निर्दोष संगणकासाठी त्यांनी हट्ट धरला. तो त्याच किमतीत द्यायला व सदोष संगणक परत घ्यायला स्पॅनिश तज्ज्ञांनी स्पष्ट नकार दिला. कर्जबाजारी तरुण उद्योजक रडवेला झाला. काहीही मार्ग दिसेना, तडजोड होईना. तेव्हा तरुण उद्योजक रागाने मला म्हणाले, 'तुझ्या स्पॅनिश अनुवादामुळेच हा सर्व घोटाळा झाला. सिमेंटच्या चौथऱ्यावर यंत्रावजार बसवताना ते जोरात आदळलं, ही गोष्ट मी फक्त तुला सांगितली होती. ती स्पॅनिश तज्ज्ञांना त्यांच्या भाषेत कळवायची नव्हती!' कीव करण्यासारखी शोकांतिका, दुसरे काय?

(ई) हजिऱ्याला गॅससंवाहक अजस्र नळपट्ट्या बसवून झाल्या होत्या. त्याचबरोबर एका बाजूला दूरवर रासायनिक द्रव्यांचे प्रचंड मोठे हौद बांधण्याचे काम कंत्राटी मजूर करीत होते. दुसऱ्या बाजूला तापी नदीच्या धक्क्यावर फ्रेंच बनावटीचे तीस फूट उंचीचे दोन पोलादी मनोरे आडव्या तुळयांसहित वीस दिवसांत जोडायचे व लवचीक नळे जोडून सुसज्ज करायचे होते. योजना अशी, की धक्क्याजवळ जहाज नांगरून पडले, की त्यातील टाक्यांना मनोऱ्यांवरून नळ जोडायचे व जरुरीप्रमाणे रासायनिक द्रव्ये व तेल जहाजावर चढवायचे किंवा त्यातून शोषून काढायचे व दूरवरच्या प्रचंड साठे हौदाकडे रवाना करायचे. अशा दोन स्वतंत्र मनोऱ्यांवर एकोणीस दिवस फ्रेंच तंत्रज्ञ, कंत्राटी कामगार व मी अहोरात्र खपत होतो. दिवसातून वीसएक वेळेला प्रत्येक मनोऱ्याच्या डुगडुगत्या शिड्यांवरून वर-खाली ये-जा चालू होती. आम्ही जीव धोक्यात घालून उंच मनोऱ्यावर तास तास खपत होतो. माझा अनुवाद फार 'उच्च' पातळीवरून चालला आहे, असा मिश्किल विचार माझ्या मनात डोकावत असतानाच खाली धक्क्यावर मजुरांच्या झुंडी आल्या, काम थांबवण्याच्या आरोळ्या सुरू झाल्या. संप सुरू झाला. कारण दूरवर बांधत असलेल्या साठ फूट उंच हौदावर काम करीत असता एक मजूर पडून गतप्राण झाला होता. नियमाप्रमाणे १० फुटांच्या वर बांधकाम करणाऱ्या मजुरांना सुरक्षा-सुविधा देण्याची कायदेशीर जबाबदारी कंत्राटदाराची असते. मी हे सर्व फ्रेंच तंत्रज्ञाला समजावून सांगितले. मग त्यानेही काम थांबविले. आम्ही दोघांनी विनापरवाना कार्यस्थळ (Site) सोडले व आमचाही निषेध व्यक्त केला.

**ए३८, जयघनश्याम, तेजपाल स्कीम, रस्ता ३, विले पारले पूर्व, मुंबई ४०० ०५७**

# अनुवादविषयक लेखनाची निवडक सूची

ही सूची मराठी आणि इंग्रजी अशा दोन भागांत दिलेली आहे. तीत लेख आणि पुस्तके या दोन्हींचा समावेश आहे. ही सूची तयार करताना श्रीमती वीणा मुळे (देवळाली कँप) आणि प्रा.प्र.ना. परांजपे यांचे बहुमोल सहकार्य लाभले. अनुवाद या विषयाला वाहिलेल्या नियतकालिकांची सूची शेवटी जोडली आहे.

**मराठीतील अनुवादविषयक लेखन**

**लेख-सूची**

अकोलकर, वंदना/भाषांतरित काव्ये : मराठी कवितेचा इतिहास, सुपर्ण प्रकाशन, पुणे १९७८ पृ. २५५-२९८

अदवंत म.ना./त्राटिका : एक चर्चा/रूपकम् (शेक्सपिअर खंड)

अर्जुनवाडकर लीला/एकं सद् विप्रा बहुधा वदन्ति (मेघदूताची चार भाषांतरे)/साहित्यसूची, १०:९-१०/ऑक्टो-नोव्हें. १९८९

अर्जुनवाडकर लीला/ललित साहित्याचे भाषान्तर : एक यक्षप्रश्न/भाषा आणि जीवन, १०:३/पावसाळा १९९२.

अवचट सुगंधा/म्हणून मी अनुवादित साहित्य वाचते/साहित्यसूची, १०:९-१०/ऑक्टो-नोव्हें. १९८९.

आगरकर गोपाळ गणेश/'विकारविलसित' प्रस्तावना/(विकारविलसित हे शेक्सपिअरच्या 'हॅम्लेट' नाटकाचे आगरकरकृत मराठी रूपांतर)

आचवल माधव/'गोतावळा' आणि अनुवादाचे काही प्रश्न/सत्यकथा सप्टें. १९७४

आपटे हरी नारायण/'विकारविलसिता' वरील समीक्षा/निबंधचंद्रिका/ऑक्टो. १८८३ ते जानेवारी १८८४

आलासे वीणा/अनुवादकाची कामगत/भाषा आणि जीवन, ५:४/दिवाळी : १९८७.

आलासे वीणा/तथापि भाषांतरलोलुपोऽहम्/साहित्यसूची, १०:९-१०/ऑक्टो-नोव्हें. १९८९.

इझेकिल निस्सीम/भाषांतराची कल्पना : काही विचार/नवभारत/ऑक्टो-नोव्हें. १९५६.

उजगारे निरंजन/सोविएत भावकविता/साहित्यसूची, १०:९-१०/ऑक्टो-नोव्हें. १९८९.

उजगरे हरिश्चंद्र/बायबलची मराठी भाषा/जागर (उजगरे सत्कार समिती)/१९८६

कर्वे माधव/एका अनुवादाची अद्भुत कथा/साहित्यसूची, १०:९-१० ऑक्टो-नोव्हें.

